पुस्तकाचे नांव: स्मृत्पर्ण

प्रकार : कादंबरी

लेखिका : विनीता देशपांडे
फ्लॅट नं १२, इडन गार्डन
सेक्टर-२६, प्राधिकरण
निगडी, पुणे ४११ ०४४
मो.नं-९८९०६४६५७७
इमेल-vsdeshpande14@gmail.com

प्रकाशन : ई साहित्य प्रतिष्ठान®
esahity@gmail.com
www.esahity.com

विनामूल्य वितरणासाठी उपलब्ध

- आपले वाचून झाल्यावर आपण हे फ़ॉरवर्ड करू शकता.

- हे ई पुस्तक वेबसाईटवर ठेवण्यापुर्वी किंवा वाचनाव्यतिरिक्त कोणताही वापर करण्यापुर्वी ई साहित्य प्रतिष्ठानची परवानगी घेणे आवश्यक आहे.

- या पुस्तकातील लेखनाचे सर्व हक्क लेखिकेकडे सुरक्षित असून पुस्तकाचे किंवा त्यातील अंशाचे  पुनर्मुद्रण किंवा एकांकिका, नाटक. सिनेमा. सिरियल. स्टेज शो किंवा तत्सम रुपांतर किंवा भाषांतर करण्यासाठी लेखिकेची परवानगी घेणे आवश्यक आहे.

# अर्पण पत्रिका

॥यत्र नार्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवता॥

प्रत्येक स्त्रीच्या मनात एक गार्गी दडलेली असते,

त्या प्रत्येक गार्गीला समर्पित माझे स्मृत्पर्ण.

विनीता श्रीकांत देशपांडे

या कथेतील सर्व नांवे, व्यक्ती आणि स्थळे काल्पनिक असून
त्यांचे कोणाही जीवीत वा मृत व्यक्तींशी साम्य आढळून आल्यास
तो केवळ योगायोग समजावा.

## विनीता ऐनापुरे

'स्मृतपर्ण' ही सौ. विनीता देशपांडे यांची पहिलीच कादंबरी; आजवर त्यांनी कविता - कथा - समीक्षा यात लेखन केले पण कादंबरी लिहिण्याचा हा त्यांचा पहिलाच प्रयत्न. पण पहिलेपणाच्या कोणत्याही खुणा लेखनात जाणवत नाहीत. एखाद्या कसदार अनुभवी लेखकाने लेखन करावं, तितक्या उंचीवर ही कादंबरी पोहोचली आहे. त्यामुळेच मी ही कादंबरी वाचायला घेतली, तेव्हा संपूर्ण वाचून झाल्यावरच ती खाली ठेवली. वाचकाला खिळवून ठेवण्याचे लेखिकेचे कौशल्यतंत्र अभिनव आहे.

कुतूहल हा या कादंबरीचा एक विशेष गुण म्हटला पाहिजे. अगदी सुरवातीपासून ते अखेरपर्यंत ह्या कुतूहलाने वाचकाला आकर्षून घेतले आहे. एका डायरीवर ही कादंबरी आधारलेली आहे. भूत आणि वर्तमानात लेखिका आपल्याला अगदी लीलया फिरवते. स्मृतींची पाने चाळताना क्षणोक्षणी मनात उत्कंठा असते. एरवी 'पुढे काय?' हा प्रश्न वाचकाला उत्सुक करतो, पण इथे मागे भूतकाळात 'काय घडले' हे जाणण्याची जबरदस्त उत्सुकता निर्माण होते. कादंबरीतले संवाद हे लेखिकेचे बलस्थान आहे. विशेषत: आजच्या तरुणाईची भाषा! गेल्या २५-३० वर्षांपूर्वीचे तरुणांच्या तोंडचे संवाद आपल्याला त्या काळात घेऊन जातात. मधूनमधून येणाऱ्या कविता त्याही अगदी सहज, कुठेही कृत्रिमता न आणणाऱ्या आणि कथानकाला पोषक अशा आहेत. तरळत जाणारं अपारदर्शकपण यामुळे ही कादंबरी 'फँटसी'च्या जवळ जाते. कुठेही रेंगाळणे हा प्रकार नाहीच. एखादे भारीभारी वस्त्रप्रावरणांनी कपाट भरलेले असावं तसे हे अनेक आठवणींनी भरलेले कपाट आहे. पण त्यात कोंबाकोंबी अस्ताव्यस्तपणा नाही. जी ती आठवण अगदी चपखलपणे जागच्याजागी बसली आहे. हे निश्चित आहे की लेखिकेकडून वाचक दुसऱ्या कादंबरीची निश्चितच अपेक्षा करतील, तिचे स्वागत करतील.

पुढच्या वाटचालीसाठी लेखिकेला मनःपूर्वक शुभेच्छा!

विनीता ऐनापुरे

५३७/२१, भवानीमाता मंदिराजवळ, यमुनानगर, निगडी, पुणे ४११०४४ फोन : +९१-०२०-२७६६०४८९, मो.९२७००२५३७४

**आ**भाळ भरून आलं होतं.

अनु आत्ताच कुठे काम आवरून निवांत बसली होती. दुपारचा हा एकांत तिला खूप हवाहवासा वाटायचा. बंद घरात मोकळा श्वास घ्यायला तिला हाच वेळ मिळत असे. आज भरून आलेल्या आभाळाने या एकांतात आणि या एकांतात ती करत असलेल्या अभ्यासात व्यत्यय आणला होता.

ती अनिच्छेनेच उठली भराभर तारेवरचे कपडे आत आणले. भांड्यांच टोपलं घरात घेतलं. आभाळ एव्हाना गडगडायला लागलं होतं. चांगलाच काळोख दाटला होता. या आभाळासोबत अनुचं मन भरून आलं, सारं काही कंठाशी दाटून आल्यासारख वाटत होतं. काळवंडलेल्या आभाळातून टपोरे थेंब कोसळायला लागलेत, आणि त्यांच्यासवे अनुच्या डोळयातून आसवं ओघळायला लागलेत. आज आसवांना आवरण्याचा धीर तिच्यात नव्हता. दाटलेल्या हुंदक्यांना आवरत ती स्वत:ला सावरण्याचा निष्फळ प्रयत्न करत होती.

मनातलं मळभ बरचं निवळलं होतं. अनु उठून कामाला लागली.

"आजी-आजोबांची वामकुक्षी आटपेल...चहा ठेवायला हवा" स्वत:शी पुटपुटत अनु स्वयंपाकघरात आली.

"अनु अगं दूध उतू जाईल" आजी घाई घाईने ओट्यापाशी आल्या.

"कां ग बरं नाही वाटत कां?" आजी

"अं नाही हो असंच " अनु.

"बिनसलं असेल काही" मनात म्हणत आजीने बोलायच टाळले. मात्र तिचा उदास आवाज आजीला खटकला.

"चहा आटोपला, आता संध्याकाळच्या नाश्ता.... काय करु? रोजरोज काय करायचं?" अनुचा स्वत:शीच संवाद चालला होता. विचारांच थैमान तिच्या जीवाला घोर लावत होतं. डायरीतील पानं तिच्या डोळयासमोर फडफडत होती. सारखी ती वाक्यं डोक्यात पिंगा घालत होती. स्मृतीतील त्या पानांना मनोमन चाळत अनुने कसे बसे घरातले काम उरकले. त्या स्मृतीपर्णांच्या पाचोळयात नचिकेतच्या अस्तित्वाच्या खुणा तिला अस्वस्थ करत होत्या.

"**आई**-बाबांना युरोप ट्रीपवरुन यायला अजून एक आठवडा आहे." नचिकेत जेवणाच्या टेबलवर बसतांना म्हणाला.

"नचिकेत अरे नचिकेत, बघ जरा बायकोकडे लक्ष दे. आज दुपारपासूनच ती उदास आहे." आजोबा

"ए अनु, काय झालं, सासूची आठवण आली कां घरातली कामं करुन दमलीस?" नचिकेत गमतीने म्हणाला.

"तसं काही नाही रे. असच जुन्या आठवणी उगाळत बसले." अनु.

हह्म्म काही विशेष, नचिकेत डोळे मिचकावत म्ह्णाला.

लटक्या रागाने अनुने त्याच्याकडे बघितलं. आजी-आजोबांसमोर मस्करी नको. हा आशय तिच्या डोळयात बघून नचिकेतही जरा गंभीर झाला.

आजी-आजोबांनी अनुच्या हातच्या स्वयंपाकाच कौतुक करीत रात्रीचं जेवण केलं.

बाकी कामं उरकून अनु हात पुसत बेडरुममधे आली.

नचिकेतनी लग्नाची सी.डी. लावली होती.

"या मॅडम बसा.....जरा बघा.....ए काहिही म्हण, राणीरंगाच्या शालूत मस्त दिसत होतीस तू."

“.......”

“अगं..जेमतेम वर्षच झालं आहे आपल्या लग्नाला..एवढ्यातच तू ..अं..अं...”

नचिकेतची थट्टा सुरुच होती.

अनुचं लक्ष कशातच नव्हतं.

“अनु... ॲनीथींग सिरीयस?” नचिकेतने काळजीनं विचारलं.

सांगू की नको या विचारात मग्न अनुने आपल्या मनाचा विचार झटकून बुध्दीला पटेल तेच करण्याचा निर्णय घेतला. आणि नचिकेतला सगळं सांगायचं ठरवलं. ती बोलणार तेवढ्यात नचिकेत म्हणाला :

“अनु..ए..राणी...कळतंय मला. आईबाबा नसल्यामुळे तुझ्यावर सध्या खूप काम पडतंय. त्यात आजी आजोबांची तब्येत सांभाळायची. सगळं कठीण जातंय कां? तुला पी.एचडीचा अभ्यास करायला वेळ मिळत नसेल ना? आईबाबांना यूरोप ट्रिपवर पाठवण्याचं माझं स्वप्न होतं. अजून बस एक आठवडा.”

अनु आपल्याच विचारत दंग बघून, "अरे हो मी खूप त्रास देतो कां?" नचिकेत डोळे

मिचकावत म्हणाला. अनुला एवढं गंभीर बघून नचिकेत चरकलाच. आपण जरा जास्तच मस्करी केली कां त्याला उगाच वाटून गेले.

आपण एकटंच बोलतो आहे हे नचिकेतच्या लक्षात आलं. काय बिनसलंय..अनु..सांगशील कां? मला वाटलं तू दमली असशील. पण कारण काही तरी वेगळंच वाटतंय.

“प्लीज..अनु काही बोलशील का?”

कसं सांगू? या विचारात गुंतलेली अनुचं कशातच लक्ष नव्हतं.

अनुला एवढी गंभीर आणि निर्विकार बघून नचिकेतला आता काळजी वाटायला लागली. त्याच्या डोक्यात विचारचक्र सुरु झालं. माहेरी आई-वडिलांना ही तर गेल्या आठवड्यातच भेटून आली. तसे ते भेटायला वरचेवर येतच असतात. मग अनुला झालं तरी काय?

“अनु! ए अनु!....ए अनुप्रिता नचिकेत बोधनकर!” आता मात्र थोडं दाटत नचिकेतनी तिला भानावर आणलं.

अनुने पाणावलेल्या डोळयांनी एक जुनाट डायरी त्याच्या पुढे केली.

नचिकेतनी ती डायरी हातात घेत विचारलं “कुठे सापडली? कोणाची आहे?”

ही डायरी अनुच्या काळजीचं कारण आहे हे एव्हाना त्याच्या लक्षात आलं होतं.

"परवा आईबाबांचा लंडनवरुन फोन होता. बाबांचे मित्र आहेत ना रघुनाथ सरदेसाई, त्यांचा मुलगा तिथेच असतो, त्याचा फोन नंबर बाबांनी पासबुकवर लिहून ठेवला होता. तो मी आईबाबांच्या कपाटातून काढतांना.. ही डायरी आईंच्या कपाटात सापडली.”

“आईच्या कपाटाला कशाला हात लावलास?” नचिकेतनी चिडून विचारलं, “आम्ही आजवर कुणीही त्याला हात लावला नाही आणि तू? आई नेहमी त्याला आठवणींच कपाट म्हणते. तिच्या खूपशा आठवणी त्या छोट्या कपाटाशी निगडीत आहेत.”

"तसं नाही रे मी आजीच्या बांगड्या आणि गोफ आईंच्या कपाटात ठेवायला गेले, म्हणजे आजींनीच मला तसं सांगितलं" घाबरत अनु म्हणाली.

“वरच्या खणात एक जुनाट पण खूप सुंदर साडी दिसली. आईंना मी त्या साडीत कधीच बघितले नाही. त्यातून बाहेर निघालेल्या पदराच टोक .अं..म... मी ते नीटच करायला गेले.. अरे मला कारभार नव्हता करायचा नचिकेत, "तेवढ्यात ही डायरी त्या साडीतून खाली पडली." आवंढा गिळत अनु म्हणाली. खरं तर मी ही डायरी वाचणार नव्हते. त्यातून एक फोटो बाहेर पडला तो ठेवण्याच्या नादात मी काही ओळी वाचल्यात....आणि मग मला पूर्ण डायरी वाचायचा मोह आवरलाच नाही.” अपराधीपणाने अनु म्हणाली.

"असं काय लिहिलं असावं की ज्यामुळे अनुला एवढा त्रास होतो आहे." नचिकेत स्वत:शी पुटपुटला.

या विचारात अनुचं चुकलं हे जरी त्याच्या लक्षात आले असले तरी डायरीत काय आहे? या विचारात तो तिच्याशी न बोलता डायरी घेत टेरेसवर येऊन बसला.

"थांब नचिकेत..." तो डायरी वाचायला सुरवात करणार तेवढ्यात अनुने त्याला आवाज दिला.

’कुठून सुरवात करावी?’ या संभ्रमात अनुने त्याचे हात हातात घेत त्याला सांगितलं.. "माझं तुझ्यावर जीवापाड प्रेम आहे हे तू कधीच आणि कुठल्याच क्षणी विसरु नको आणि या स्मृतींच्या पनांमध्ये उगाच गुंतु नकोस."

या वरुन डायरीत नक्की त्याच्याबद्दल काय लिहिलंय एका अनामिक जाणीवेने नचिकेत शहारुन गेला.

त्याला आता मात्र डायरी वाचायची घाई झाली होती. पहिलं पान उलटतांना उगाच हात आणि मन थरथरुन गेलं. काय असेल? या भितीने त्याचा अख्खा देह मुंग्या याव्या असा झिणझिणला.

पहिल्याच पानावर ॐ गणेशाय नम: आणि त्याच्याच खाली "स्मृतपर्ण" लिहिलं होतं. मधोमध गार्गी देवदत्त खानोलकर बारीक अक्षरात लिहिलेल बघून नचिकेत जरा गांगरलाच. आईचं नाव गार्गी पण हे देवदत्त खानोलकर कोण? एवढ्या वर्षात त्यानी हे नाव कधीच ऐकले नव्हते. खानोलकर अडनाव त्याने आजीच्या तोंडून ऐकल्याचे पुसटसे आठवत होते. "अरे हो आजीचे माहेर खानोलकरच आहे" मनोमन आठवत तो डायरी वाचू लागला :

१४/०८/१९७५

आज माझा अठरावा वाढदिवस. मला लिहिण्याची आवड म्हणून बाबांनी मला ही डायरी आणि कॅमलीनच सोनेरी रंगाचं झाकण असलेलं फाउन्ट्न पेन भेट दिलं. मी त्याच दिवशी ठरवलं नेमानी ही डायरी लिहायची. आज सुरुवात कुठून करू? लहानपणापासून माझी आवडती कविता ग.ह. पाटिल यांची

"देव" कवितेने सुरवात करते:

देवा तुझे किती , सुंदर आकाश
सुंदर प्रकाश, सूर्य देतो ॥
सुंदर चांदण्या , चंद्र हा सुंदर
चांदणे सुंदर , पडे त्याचे ॥
सुंदर ही झाडे , सुंदर पाखरें
किती गोड बरें ,गाणे गाती ॥
सुंदर वेलींची , सुंदर ही फुलें
तशी आम्ही मुले, देवा तुझी ॥
इतुके सुंदर , जग तुझे जर
किती तू सुंदर , असशील ॥

आज वाढदिवसाच्या दिवशी मला सगळच सुंदर दिसत आहे. आत्यानी मला गुलबाक्षी रंगाचा पंजाबी ड्रेस घेतला. आईनी ओवळून मला अबोलीचा गजरा दिला. सगळं कसं छान वाटत आहे ना! मावशीने दृष्ट काढत म्हटले "जरा मोठ्या मुलींसारखी वाग. आता पोरकटपणा बास झाला हं...मुलांसोबत खेळणं बंद करा. ताई तू समजवून सांग कार्टीला, नुसती उनाडक्या करत फिरत असते." “आधीच रंग सावळा त्यात अशी उनाड फिरत राहिलीस तर काळीकुट्ट

होशील... मग लग्न कसं जमणार!" मावशीने काळजीच्या स्वरात म्हंटलं.

"ए मावशी आज तरी उपदेशाचे अभंग नको ना.. माहिती आहे ना मी माझ्या बाबांची लाडाची मैना आहे." मी लटक्या रागानं म्हटलं. माझा वाढदिवस दरवर्षीसारखा यंदाही साधाच आणि छान साजरा झाला. आईवडिलांची एकुलती एक असल्याने माझे सगळे लाड, सगळे हट्ट पूर्ण होतात.

१५/०८/१९७५

आज कॉलेजमधे पंधरा ऑगस्टचा कार्यक्रम झाला. मला खूप बक्षीसं मिळालीत. खेळात, निबंध स्पर्धेत, वादविवाद स्पर्धेत. कालचा वाढदिवसाचा आनंद. त्यात आजचा बक्षीसांचा आनंद. मी खूप खूश आहे. आज का कोणास ठाऊक जरा वेगळंच वाटत होतं. खरंच का मी मोठे झाले? आज समितीत आचार्यबाई मला असंच काही बोलतं होत्या. मला आता मोकळेपणाने खेळता येणार नाही या कल्पनेने मला मोठ्ठं होण्याची एकदम धास्ती बसली......

बापरे! जवाबदारीची जाणीव ठेवायला पाहिजे असा विचार मनात येताच मी ते पटकन झटकून स्टाफरुममधे हुद्दारसरांना बोलवायला गेली. आजही रसायनशास्त्राच्या वर्गाला ते आले नाहीत. त्यांची तब्येत ठीक नाही असं कळलं. गेले आठ दिवसांपासून सर आले नव्हते. उद्द्या मसुळकर मॅडमला विचारु. त्यांना माहित असणार सरांना काय झाले आहे ते.

मला वाटलं होतं डायरीच अर्ध पान तरी मी लिहेन पण छे काय सुचतच नाही. असो, आज एवढंच. मात्र काहिही झालं तरी कवितेच्या दोन ओळी या डायरीत नेटाने लिहायच्या. मला मराठी विषय तसा फार आवडत नाही, कविता खूप आवडतात. आजच्या कार्यक्रमातले सावरकरांनी लिहिलेलं हे गाणं आठवलं तरी अंगावर शहारे येतात. तर आजच्या ओळी :

जयोस्तुते श्री महन्मंगले ! शिवास्पदे शुभदे
स्वतंत्रते भगवती ! त्वामहं यशोयुतां वंदे

या स्वातंत्र्याच्या स्तोत्राचा अर्थ समितीतील आचार्यबाई किती छान समजवून सांगतात. परतपरत ऐकावसा वाटतो. आज समितीत छान कार्यक्रम झालेत...माझ्या भाषणाला भरपूर टाळ्या पडल्यात.

१६/०८/१९७५

मसुळकर मॅडमकडून हुद्दार सरांना कावीळ झाल्याचे कळलं. बाप रे! आता सर जवळ जवळ वीस पंचवीस दिवस येणार नाहीत. त्या विषयाचा अभ्यास आता मला स्वत:ला करावा लागणार. विचार करुनच वाईट वाटलं. सर खूप छान शिकवतात. जास्त अभ्यास करायची गरज रहात नाही.

आज माझं आणि सुमीच भांडण झालं. ते नेहमीच होतं. आज मला सुमीचा खूप राग आला. कुमुदला पण तिच्या वागण्याचा राग आला. म्हणजे मी बरोबर होते..हो हो माझंच बरोबर होतं. सुमी मला असं कां बोलली? आता हे तिलाच विचारायला हवं. तिच्या दादाचं लग्न ठरलं होतं. तिचं थोडीच.. कधी कधी उगाच भाव खाते सुमी. तिला बघून घेईल. असो.

माझ्या वाढदिवसाला मी फोटोस्टुडिओमधे जाऊन फोटो काढला होता, तो उद्या  बाबा बँकेतून येतांना घेऊन येणार. केव्हा फोटो बघायला मिळणार असं मला वाटत आहे. ही उत्सुकता सुमीला कळेल असं वाटलं. पण नाही! ती अजूनही नाराजच आहे. आज कुमुद म्हणाली सुध्दा 'ए तुम्हा दोघींच काय बिनसलय? '

ही सुमी ना छोट्या छोट्या गोष्टींचा बाऊ करते. मैत्रीत चालतं सारं, होतं कधी विसरायला. तिला म्हणजे सर्व  गोष्टी व्यवस्थित सांगाव्या लागतात. माझ्या घरी काय चाललय? ...कोण? काय? कुठे जाणार? तपशिलवार माहिती देणं इतक्यात मला नाहीच जमलं म्हणून रुसली बया. कठीण आहे, आता हिचा रुसवा काढायचा म्हणजे नेमकी कशावर रुसलीय ते आधी शोधून काढायला हवं.

सारेच म्हणतात सुमी इतकी कटकटी मुलगी आहे, तू अशी बिनधास्त तुम्हा दोघींच पटतं कसं?ती दक्षिण धृवाचं टोक ... मी उत्तर धृवाचं टोक...दोघे एकमेकांना आकर्षित

करतात तश्या आम्ही दोघी. आजच्या ओळी सुमीच्या अबोल्यासाठी :

चांफा बोलेना, चांफा चालेना,
चांफा खंत करी काहीं केल्या फुलेना
गेले अंब्याच्या बनी
म्हटलीं मैनसवे गाणी
आम्ही गळ्यात गळे मिळवून.

१८/०८/१९७५

हे काय, काल मला डायरी लिहायला वेळ नाही मिळाला. आज कॉलेजमधे मराठीच्या नवीन लेक्चरर सौ. प्रभुणे आल्यात. रुक्ष विज्ञान विषयांच्या अभ्यासानंतर मराठीचा तास छान वाटतो. या मॅडम छान शिकवतात.

सुमी काल आणि आजही कॉलेजमधे माझ्याशी बोलली नाही. ती नाही बोलली याचा मी एवढा त्रागा का करते मलाच कळत नव्हतं. राहू दे नाही बोलत तर नको. मी नाहीच बोलणार तिच्याशी. हे काय या सुमीच्या रागापायी मला लिहायला देखिल सुचत नव्हतं.

घरी चलते का? सुमीला विचारलं तर नाक मुरडवून चालली गेली.

खरं तर तिला माझा फोटो दाखवायचा होता. आईने तो आता कपाटात ठेवला असेल. ती जेव्हा घरी येईल तेव्हा दाखवेन. आज कॉलेजमधे छान कविता शिकवली. अजून ओळी ओठावर घुटमळतात आहे.

पिवळे तांबुस उन कोवळे पसरे चौफेर
ओढा नेई सोने वाटे वाहुनिया दूर. ॥१॥
झाडांनी किती मुकुट घातले डोकिस सोनेरी
कुरणावर शेतांत पसरला गुलाल चौफेरी ॥२॥
हिंरवे हिंरवेगार शेत हें सुंदर साळीचे
झोके घेते कसें, चहुंकडे हिरवे गालीचे. ॥३॥

२०/०८/१९७५

एक तर पावसानं धिंगाणा घातला होता. त्यात मी आज दोनदा ओली झाली. कदाचित त्यामुळेच आज सुमीचा अबोला  माझ्या डोक्यात गेला होता. आज कॉलेजमधून थेट सुमीच घर गाठलं. मी तिथून परस्पर समितीत जाणार होते. सुमी एवढी चिडली असेल असं वाटलंच नव्हतं. तिची समजूत काढता काढता मीच वैतागले होते.

डायरी लिहिण्याचा मूडच होत नाही आज....आज एवढंच.

आईला पटवून मी सुमीला दाखवायला माझा वाढदिवसाचा फोटो घेऊन गेली होती. रागात तिने तो बघितलाच नाही. ही सुमी ना झाल्या गेल्या गोष्टींचा कीस काढते. मी असल्या गोष्टींकडे दुर्लक्ष करते. मग आज का नाही करु शकले? खरं तर मी या प्रकरणाचा तिथेच तिच्या घरी सोक्षमोक्ष लावायला हवा होता. मी का तिच्यासारखं वागली? नको, ती उद्या कॉलेजला आले की मिटवते हे प्रकरण. नाही तर माझ्यात आणि तिच्यात फरक काय उरला. मैत्रीत चालणारच असं. आज छान काय घडलं... कॉलेजमधे मॅडमनी भा.रा. तांबेंची कविता "सायंकाळची शोभा" पूर्ण केली आणि माझ्या रसग्रहणाला शाब्बासकी मिळाली.

सोनेरी, मखमली, रुपेरी पंख कितीकांचे
रंग किती वर तर्हेतर्हेचे इंद्रधनुष्याचे ॥४॥
अशीं अचल फुलपांखरे फुले साळीस जणुं फुलती
साळीवर झोपलीं जणू का पाळण्यात झुलती ॥५॥
झुळकन सुळकन इकडून तिकडे किति दुसरीं उडती
हिरे, माणके, पांचू फुटुनी पंखच गरगरती ॥६॥
पहा पांखरे चरोनि होती झाडावर गोळा
कुठें बुडाला पलीकडिल तो सोन्याचा गोळा ? ॥७॥

२२/०८/१९७५

हे काय आजकाल रोज डायरी लिहायलाच जमत नाही. कॉलेज-अभ्यास-समिती यात वेळच होतं नाही. सुमीची गाडी रुळावर आली आहे खरं पण ती थोडी नाराज दिसली. आजही रसायनशास्त्राचा वर्ग झाला नाही. या विषयाच्या अभ्यासाबद्दल मला माझीच काळजी वाटत होती. मला कोण मदत करु शकेल? माझी मलाच करावी लागेल.

आजकाल आईला कामात मदत करावी लागते. खूप दिवसांपासून आईची तब्येत ठिक नाही. बाबांना आजच गावाला जायचं होतं. आत्या परवा येणार तोपर्यंत आई आणि घर दोन्ही सांभाळायलाच पाहिजे. कुमुद आणि सुमी आज रात्री झोपायला येणार. बाबा गावी गेले की त्या मला आणि आईला सोबत करायला यायच्या. मग आमचा धिंगाणा, तो फक्त आमच्या घरीच चालायचा आणि आईलाही आवडायचा.

माझ्या एक लक्षात आलं होतं ते म्हणजे माझे आई बाबा मला व्यक्त होण्यासाठी मदत करायचे आणि मतं, इच्छा, अपेक्षा मांडण्याचं स्वातंत्र्य, प्रत्येकाची अभिव्यक्ती आमच्या घरात जपली जात होती. माझ्या इतर मैत्रीणींकडे वडिलांचा धाकच इतका जब्बर आहे की "ते नाहीच म्हणतील" हे गृहीत धरुनच कार्यक्रम ठरत असे. मी बाबांना नाही पटलं तर नाही म्हणायचे. त्यांच्या नकाराचे ते सशक्त कारणेही मला सांगत की एखादा कार्यक्रम किंवा स्पर्धेला मला ते का जाऊ नको म्हणतात. देशात भले आणीबाणी असो, आमच्या घरात लोकशाही आहेच.

खरंच आज मलाच मी मोठी झाल्या सारखे वाटले. उगाच माझे बाबा मला त्यांचा मुलगा नाही मानत. आहेच मी माझ्या बाबांची लाडकी.

आजच्या ओळी बालकवींच्या औदुंबर कवितेतील :

ऐल तटावर पैल तटावर हिरवाळी घेउन
निळा सांवळा झरा वाहतो बेटाबेटातून

चार घरांचे गांव चिमुकले पैल टेकडीकडे
शेतमळ्यांची दाट लागली हिरवी गर्दी पुढे

पायवाट पांढरी तयांतून अडवी तिडवी पडे
हिरव्या कुरणांमधुन चालली काळ्या डोहाकडे

झांकळुनी जळ गोड काळिमा पसरी लाटांवर
पाय टाकुनी जळांत बसला असला औदुंबर

२५/०८/१९७५

आज आत्या आल्यामुळे मला जरा तरी वेळ मिळाला. कॉलेज -अभ्यास- घर सांभाळतांना कळलं की आईला किती काम पडत असणार ते. त्यात आमच्या गौराबाईंनी कामाला दांडी मारली. कामाचा राबता संपतच नव्हता. त्यात भर म्हणजे सुमी प्रकरण काही डोक्यातून जाता जात नाही.

हम्म डायरे माझे सखे, आता सांगते तुला हा गुंता. सुमी माझी खासम खास मैत्रीण. तिच्या दादाचं लग्न ठरलं. तिने तिच्या वहिनीचा फोटो मला फक्त मला दाखवायला शाळेत आणला होता. अंतरमहाविद्द्यालय स्पर्धेच्या नादात मी तो नीट बघितला नाही, त्यावर खूप छान प्रतिसाद दिला नाही. त्यात मी माझ्या वाढदिवसाच्या कौतुकात गुंग होते. आणखी खूपशा गोष्टी. जसे कुमुदचं तिच्या घरचे लग्नाचं बघत आहेत. (खरंतर काकूंनी ओळखीचे स्थळ म्हणून आईकडे चौकशी केली एवढंच मला माहिती होतं) हे मी तिला सांगितलं नाही. सुहास..माझा आत्ये भाऊ येऊन गेला, मुख्य म्हणजे तो तिला न भेटता गेला... आमच्या परसदारातील जांभळाच्या झाडाची जांभळं तिला दिली नाही, आईला बरं नाही. अश्या खूपश्या गोष्टी सांगायच्या राहून गेल्या म्हणून स्वारी नाराज होती. तिची समजूत काढता काढता नाकी नऊ-दहा आले. शेवटी नरुमावशी तिचीच आई तिच्यावर चिडली:

"अग तिच्या आईला बरं नाही तरी ती तुला भेटायला आली. आणि तू?"

तेव्हा कुठे बाईसाहेब शांत झाल्यात.

आजच्या ओळी: सुमीच्या घराच्या दारासाठी....इंदिरा संत यांच्या "मृगजळ" कवितेतील काही ओळी :

दारापाशी उभी तुझ्या मी

बंद दार तरि, अधीर पाउल
निसटूं बघते
चपलांच्या बंधातून ;
क्षण थरथरते
बोट विजेच्या बटणावरती..
गजबज उठती
लालविजेची नादपांखरे
अंगाअंगातून

मलाही आजवर नाही उमगलं की मी सुमीचे रुसवे फुगवे आनंदाने का काढते? मैत्री...जिवाभावाची मैत्री अजून काय?

>..........<

पुढची पानं कोरी होती. म्हणून नचिकेत थांबला.

डायरी वाचता वाचता नचिकेतच्या डोळ्यासमोर क्षणभर काळीसावळी धीट मुलगी उभी राहिली. गार्गी माझी आई तर गोरी पान मग हे सगळं कोणी लिहिलं असावं? कोणाची ही डायरी? त्याच्या प्रश्नार्थक चेहरा बघून अनुला गहिवरुन आलं. त्याचा हात हातात घेत म्हणाली, “रात्र फार झाली आहे उद्या वाच.”

पण नचिकेतची उत्सुकता आता शिगेला पोहचली होती. याचा सबंध आपल्याशी कसा हे त्याला जाणून घ्यायचं होतं. आत्तापर्यन्तच्या वाचण्यातून त्याला कुठलाच अंदाज येत नव्हता. डायरीतील एकुलत्या एक गार्गी बद्दल तो विचार करु लागला. डायरीच्या शेवटच्या पानांमधे काही फोटो होते, ते निरखून बघू लागला. एका १७-१८ वर्षाच्या तरुणीचे फोटो होते. ते ब्लॅक अॅन्ड व्हाइट आणि जुने असल्याने काहीच कळत नव्हते. त्याने फोटोच्या मागे बघितले "गार्गी देवदत्त खानोलकर..ता.१४/०८/१९७५" आणि कुठल्यातरी स्टुडिओचे नाव देखिल लिहिले होते. हेच नाव आता त्याच्या डोक्यात पिंगा घालत होते. कोण ही गार्गी? सुहास तर माझ्या बाबांच नाव, गार्गी माझ्या आईचं. माझा या सर्वांशी काय सबंध? सुहास हे नांव डायरी लिहीणाऱ्या गार्गीच्या आतेभावाचं नांव. आणि तो आल्यावर भेटला नाही म्हणून सुमी गार्गीवर रागावली. ते का?

ही गार्गी आणि माझी आई गार्गी वेगवेगळया? की एकच? पण ही गार्गी सावळी आहे आणि

माझी आई तर गोरी पान.

हा सुहास आणि माझे बाबा सुहास वेगवेगळे की एकच?

त्याच्या विचारांची गाडी यावरच येऊन थांबत होती. त्याच्या लहानपणी आई तिच्या अनेक आठवणी सांगायची. याचा उल्लेख त्याला ऐकल्याचा आठवत नव्हतं. हं एक मात्र त्याला नक्की आठवतय की आई त्याला या कपाटाला हात लावला तर फटके घालायची. तिच्या खूप आठवणी निगडीत आहे असं ती नेहमी म्हणत असे. तसं पाहिलं तर त्या  कपाटात जुन्या सामानाखेरीज काही विशेष नव्हतं हे त्याला आठवत होतं. घरातील नवे फर्निचर करतांना ते मोडीत काढण्याचा विचार त्याने आई बाबांपुढे मांडला होता. आई तयार झाली नाही. त्याने त्या कपाटाभोवती लाकडाचे दोन दार बसवून ते जुनं कपाट इतरांना दिसणार नाही अशी व्यवस्था केली होती. बाबा नेहमी ते तुझ्या आईचं आठवणींच कपाट आहे रे..म्हणून टिंगल करायचे.

पाणी पिऊन नचिकेतने परत डायरी वाचायला घेतली.

मधली बरीचशी पानं कोरी होती.

२५/०९/१९७५

मधले दिवस कसे भुर्रकन उडून गेलेत. किती प्रयत्न केला डायरी लिहायचा, शक्यच झालं नाही. अभ्यासक्रम वेळेत पूर्ण करायला हवा म्हणून कॉलेज मधे हुद्दार सर वेगाने शिकवत होते.

काय कोण जाणे  बाबा आज नेहमीसारखे वाटले नाही. बँकेत काही प्रॉब्लेम आला असं वाटत आहे. लिमये काका हल्ली रोज येतात. त्यांच्या बोलण्यावरुन तरी काही अंदाज येत नाही आहे. असो...बाबा सक्षम आहे समस्या सोडवायला. आई मात्र उगीच काळजी करत बसते.

कुमुदच लग्न जमलं. ऐकून फार आनंद झाला नाही. कुमुद किती हुशार आहे. तिने अजून शिकायला हवं. तिच्या वहिनीच्या नात्यातल्या मुलाने मागणी घातली म्हणे. समजा या स्थळाला कुमुदने नाही म्हटले असते तर? असो हा ज्याचा त्याच्या घरचा प्रश्न आहे. मला वाटून काय उपयोग. कुमुद लग्नाला सहज तयार झाली याचं मला आश्चर्य वाटलं. सुमी तरी कुठे खुश आहे हे ऐकून. असो आमची एक मैत्रीण आम्हाला सोडून दूर मराठवाड्यात जाणार या दु:खाचा भार आम्हाला सध्यातरी पेलवत नव्हता. कुमुदला याबाबत सल्ला हवा असता तर तो तिने मागितला असता.

याविषयावर तिच्याशी बोलू असा सुमीचा हट्ट चालूच होता. मी म्हटलं "कुमुदच्या लग्नाबद्दल तिचे आईवडिल समर्थ असतांना आपण काय बोलणार. शेवटी ज्याने त्याने आपआपल्या आयुष्याचे निर्णय पडताळून बघणे योग्य असते." (अर्थात असे माझे बाबा म्हणतात). त्यावर मी  ठाम होते.

कुमुद तशी अबोल आणि साधी सुधी. या विषयावर तिने आपले मत घरच्यांना

सांगितले नसणार असं सुमीचं म्हणणं. तो तिच्या आयुष्याचा प्रश्न आहे. यावर तिनेच गंभीरपणे विचार करायलाच हवा, आपण नाही. हे माझं म्हणणं. या वरुन माझी आणि सुमीची बाचाबाची झाली.

शेवटी कुमुदला गाठून आम्ही तिला विचारलं असता ती आमच्याशी मोकळी बोलली नाही. मी तिला चारचारदा विचारलं लग्नाबद्दल तुझ्या काही अपेक्षा असतील, स्वप्नं असतील. त्या कल्पनेत तो मुलगा बसतो का? पठ्ठी काही बोलायला तयार होईना. शेवटी आम्ही दोघींनी त्या विषयावर बोलायचं सोडून दिलं.

आजच्या ओळी कुमुदला समर्पित गोविंदाग्रजांची "गोफ" कविता. जो ती अर्धाच विणून पुढे निघाली, वेगळ्या वाटेवरुन...

पदर आणिले तुझे कांही तूं, माझे आणि मीहि तसे
हांसत खेळत गोफ गुंफिला, कळले नाही कधी कसे
एकमेकांभवती फिरतां , गिरकी जीवांना आली
चढत चालला खेळ जसा तो, नजरहि धुंद तशी झाली
परि दैवाचा खेळ निराळा- खेळ नकोसा तुज झाला
ज्या खेलाने जीव रंगला, त्याचा कंटाळा आला......
थांब, उलगडूं गोफ कठीण हा शांत बुद्धिने सखे असा-
की न तुटावा पदर एकही, धागा धागा नीट तसा

२/१०/१९७५

दिवाळी जवळ आली. सगळे दिवाळीच्या तयारीत मग्न आहेत. आम्ही मैत्रिणी नवा सिनेमा "शोले" बघायचा विचार करत आहोत. सर्वांच्या घरुन परवानगी मिळाली पाहिजे. तरच मज्जा. अमिताभ माझा आवडता नट. माझा काय सर्वांचाच. आई कुमुदचं केळवण करायच्या मागे होती. रुखवंतासाठी तू काहीतरी कर म्हणून माझ्या मागे लागली होती. तेव्हा मला कळलं जे या वयातल्या मुलींना कला येते ती माझ्या अंगी नाहीच. भरतकाम, रांगोळी, मेहंदी, शिवणकाम बापरे! मला हे शिकायला लागणार या भितीने अंगावर काटाच आला. मी असल्या गोष्टींमधे कधीच रमली नाही आणि असलं काही शिकावं किंवा या गोष्टी मला यायलाच पाहिजे असं कधीच वाटलं नाही. मी सुधा आजीकडे प्रत्येक दिवाळीत रांगोळी काढायची. मी कशीही काढली तरी "छान आहे हं" म्हणायची.

आई गौराबाईकडून घरची साफसफाई करुन घेत होती. सुधा आजी आणि आई दिवाळीतील फराळाच्या सामानाची यादी आणि तयारी करत होत्या. सुधा आजी तशी एकटीच असते. तिला दोन मुली, एक दिल्लीला, एक मुंबईला. एक जावई मंत्रालयात तर एक मिल्टरीत. मिल्टरीत असलेल्या जावयाची वारंवार बदली होत असे. अधूनमधून त्या यायच्या पण तशी आजी एकटीच रहाते. चार वर्षापूर्वी आबाही निवर्तले, तेव्हापासून आम्हीच तिचे घरचे. आई बाबा त्यांच्याकडे जातीने लक्ष द्यायचे. कधीतरी त्यांचे नातेवाईक मंडळी येऊन राहून जायची. माझ्या तर दिवसातून चार चकरा होतात. हे नेऊन दे..ते घेऊन ये... सतत चालायचंच.

एकंदरित दिवाळीची चाहूल लागली होती. मैत्रिणी नवे कपडे नवे ड्रेस घेण्याबद्दल चर्चा करत होत्या. माझ्या सर्वात नावडता विषय होता तो. आपापल्या आवडीने घ्यायचं आणि

घालायचं. त्यात एवढी तास न तास चर्चा करण्यात वेळ कसा काय वाया घालवतात या सगळ्याजणी मला कधीच कळलं नव्हतं आणि जाणून घेण्यातही रस नव्हता. मला सगळ्या अरसिक म्हणून चिडवायच्या... मला खरंच आवडत नाही हे सारं. आजच्या ओळी: माझ्यासाठीच. कवी बींची "अनुकार" या कवितेतील ओळी :

दोष कुणाला? एकदां निखालस बोला.
भूभृत्कटावृतनखंडी,
कटु वागजल्पनतांडव मांडी
प्रतिध्वनिप्रति परिसुनि सांडी
निज भानाला, एकदा निखालस बोला.......

या रचनेतील शेवट्ची दोन कडवी खूप छान आहेत

अमोघ बळ शब्दांचे पाही
आंत साठवी अनन्तासाही
शब्दे शब्द कसा मग जाई
हा हारीला ! एकदा निखालस अबोला.
अंधार नगराचाचा उलटा न्याय
अदंडय दंडा भाजन होय
पय घटिका पी, घड्याळ हाय
खाई टोला, एकदा निखालस बोला

५/१०/१९७५

कॉलेजमधे परीक्षा सुरू झाल्यात. बाबांनी आजच माझ्या रेडिओ ऐकण्यावर नाराजी व्यक्त केली. मला त्यांचा थोडा राग आला. तसा बाबांचा राग येत नाही, आला तर लवकर निवळतो. आईचं मात्र तसं नाही. आमचा अबोला बरेच दिवस असतो. बाबांच्याच मध्यस्थीने तो बोलका होते. बाबांचा मूड आज छान होता. बहुतेक त्यांचं टेन्शन संपुष्टात आलं असावं. देवाची कृपा....

अरे... माझ्या तोंडून हे शब्द ऐकून मीच चरकले... पण मी नास्तिक नाही, श्रध्दाळु आहे... याची जाणीव मला आजच झाली. "परिस्थिती माणसाला खूप काही शिकवते" आणि "परिस्थिती माणसाचा अदृष्य गुरु आहे" हे माझ्या बाबांचे ठरलेली वाक्यं. मी हसते या वाक्यांना. पण ते म्हणतात मोठी झाल्यावर पटेल तुला. आमचे असे शाब्दिक मुक्तकं बरेचदा होत असतात. आईच या मुक्तकांना पूर्णविराम देत असे. नेहमीच माझ्या बाबांना मला लाडावून ठेवल्याचा टोमणा ऐकावा लागत असे.

माझा अभ्यास तसा बरा चालला आहे. भिती आहे ती रसायनशास्त्राच्या पेपरची. सुमीचे पेपर तिच्या बोलण्यावरुन कळत होते की बरे गेलेत. हल्ली अभ्यासात तिचं लक्ष नसतं. परिक्षेच्या टेन्शनने आज कुठलीच कविता आठवत नाहीय. खरंच...अगदी कुठलीच नाही. (मी कुठलीच शपथ कधीच घेत नाही, खोटं कधी बोलत नाही ) मला या शपथ घेण्याची का कोणजाणे लहानपणापासून चीड येते. लहानपणी कळत नव्हते ते का म्हणून, पण आता असं वाटत की शपथ घेणे म्हणजे आपण समोरच्या माणसाच्या मनात अविश्वास निर्माण करणे.

१५/१०/१९७५

संपली एकदाची परीक्षा. तिमाहीचं मला टेन्शन आलं होतं, हं...थोडसं आलं होतं. कुमुदच्या घरी तिच्या लग्नाची बोलणी आहेत असं कळल्यावर आम्ही ती आटोपल्यावर सिनेमा बघायचं असं आज ठरवलं. कुमुदचा निरंजन दादा तिकीटं काढून देणार. नेहमीप्रमाणे ललिता, वेणू, विजया, रेणुका आणि गौरी यांच्या घरून "ना हरकत परवाना मिळवणे" हे माझं मिशन होतं. तसा हा आमचा नेहमीचा कार्यक्रम. सिनेमाचं ठरलं रे ठरलं मैत्रिणींच्या आई वडिलांकडून होकार आणायची जवाबदारी माझ्यावर असायची. मैत्रीणींच्या आया, तू जाणार आहेस ना मग पाठवते. असं म्हणत हो म्हाणायचे.

आजच्या ओळी कॉलेजमधे शिकवलेली बहिणाबाईंची "मन" या कवितेतील आहे.

मन वढाय वढाय
उभ्या पिकातल ढोर
किती हाकला हाकला
फिरे येतं पिकांवर......
......मन पाखरु पाखरु
त्याची काय सांगु मात
आता व्हतं भुईवर
गेलं गेलं आभायत.

३०/१०/१९७५

काय हल्ली डायरी लिहायला होत नाही की मीच लिहित नाही. दोन गोष्टी गेल्या आठवड्यापासून मला त्रास देत होत्या. ते म्हणजे आईकडून कळलं की कुमुदच्या लग्नात चांगलाच हुंडा मागितला आहे आणि दुसरी गोष्ट म्हणजे, खरं तर हे गुपित मी लिहू नको लिहू या संभ्रमात होते. म्हणून डायरी लिहिणे टाळत होते. सुहास दादाच्या आपल्या घरी चकरा नेहमीपेक्षा वाढल्या आहे. सुमीचं सुहासदा असतांना सतत येणं मला कधीच लक्षात नाही आलं. नेमकं आज समितीतून येतांना मी दोघांना कॉरपोरेशनच्या शाळेजवळ बघितलं. दोघं नेहमी सारखी बोलत होती....."पण"........? मला काही तरी वेगळंच वाटलं. हा "पण" शोधून काढायलाच हवा. सुमीला थेट विचारुन टाकते. बघू काही सांगते का?

कुमुदच्या लग्नाबद्दल माझ्या मनात का सारख्या शंका येत आहेत माहिती नाही. कोणाला विचारु? आईला, हो अरेच्चा आईलाच विचारुया. या विचारानं मलाच हायसं वाटलं. माझी आई मला कधीच चुकीचा सल्ला देणार नाही याची मला खात्री होती.

आज वर्तमानपत्रात एक सुंदर कविता छापून आली होती...

कवि बींची "आठवण" कविता :

ऊन उतरते होतें, वारा पडला होता बंदी
दिशादिशांच्या नेत्री भरली होती मादक धुंदी
नेती जिकडे पाय मागुनी शरीर तिकडे जातें
शून्यत्वाचा अभाव उघडे डोळे पहात होते
मंदावत पाउले चालली खिन्न मनाच्या भारें
तीव्र भाव हो जसा मंदतर अवास्तविक विस्तारें

मूर्तीमंत रुक्षता वावरे अफाट त्या मैदानी
उडता जीव न दिसला एकही ध्वनि नच पडला कानी
रिता एकटेपणा जगी या भीषणतर भारी
साक्षात्कारी अनुभविली मी मारकता ती सारी.

या उदास ओळींचा मला फारसा अर्थ कळला नाही. का कोण जाणे माझ्या मनाला खूप भावल्यात.

४/११/१९७५

आईशी मी कुमुदच्या लग्नाबद्दल बोलले. तिने मला कुमुद या लग्नाला मनापासून तयार आहे का एवढाच प्रश्न विचारायला सांगितला. कारण आईच्या मते कुमुदच्या घरचे तिच्या सासरच्या मंडळींवर खूपच खूश आहेत. त्यांची आर्थिक परिस्थिती तर छानच आहे, त्यांचा त्यांच्या गावात दरारा आणि रुबाबही आहे. अशा स्थळाला नाही म्हणणे ते शक्य नाही. कोणाच्या खासगी निर्णयात ढवळाढवळ करण्याचा आम्हाला अधिकारही नाही.

माझी कुमुद्बद्दल काळजी करणे हे आईला रास्त वाटले. असो....आई आपलं नेहमीच वाक्य "प्राक्तन आपल्या हाती नसतं, ज्याचे त्याला मिळणारच शेवटी" बोलून मोकळी झाली. मीही ठरवले आईने सांगितलेले ऐकायचे. आजच्या ओळी मनातलं मनातच दडवून ठेवणारी कुमुद हिच्यासाठी "सांग पोरी सांग" सारे ही मनमोहन यांची कविता:

सांग पोरी सांग सारे, सांग पोरी सांग सारे
लाजतेस का? सांग सारे.......................
कुंकु भाळी पांगलेले, गाल दोन्ही गुंजलेले
मैत्रीणीशी बोलतांना, अंग तुझे का शहारे?

या ओळी वाचून नचिकेत सुन्न झाला. डायरी वाचता वाचता तो एका वेगळ्याच विश्वात पोहचला होता. नकळत या कथेत तो गुंतत गेला. वेळेचं भान नाही, काळाचं भान नाही. कोणी तरी गोष्ट सांगतो आहे आणि तो ऐकतो आहे असा त्याला भास झाला. तो स्वत:शीच बोलतांना बघून,

“कॉफी घेणार का?” अनूने विचारले.

थोडसं भानावर येत तो म्हणाला हं कर चालेल.

कुमुद...सुमी..सुहास....गार्गी....तिचे बाबा... यात नचिकेत कुठेतरी स्वत:लाच शोधत होता.

कॉफी पिऊन नचिकेतने परत डायरी वाचायला सुरवात केली..

मधली बरीच पानं रिकामी होती.

काही फोन नंबर्स, काही हिशेब, काही अकाउंट नंबर्स अधेमधे लिहिले होते. फोटोवरुन नचिकेतला काही अंदाज लागत नव्हता. संपूर्ण डायरी वाचल्याशिवाय पर्याय नव्हता. उद्याची ऑफिसला सीक लीव्ह टाकायची आणि हे काय प्रकरण आहे हे वाचून काढायच. त्याला पेंग येत होती, डोकं विचारांनी बधीर झालं होतं. डोक्यात थैमान घालणारे विचार काही त्याला स्वस्थ झोपू देणार नव्हतेच. बेडवर झोपून तो डायरी वाचू लागला. अनुला गाढ झोप लागली होती. तिला कशाला उठवायचं म्हणून तो लाईट बंद करुन स्टडीमधे गेला.

१७/११/१९७५

किती दिवसांनी लिहितेय. कारणही तशीच होती. आईला दवाखान्यात हलवलं आहे. बाबांवर बराच ताण आला आहे. पायाचं ऑपरेशन करावं लागणार का? हे दोन दिवसात कळणार आहे. आत्या मावशी आळीपाळीने येऊन घर सांभाळतात. माझा अभ्यास, घरातील इतर कामं आणि आईपाशी दवाखान्यात बसणं यातच सारा वेळ जातो आहे. उद्या एखादं चांगल पुस्तक घेऊन जाईन वाचायला. कॉलेजमधून परस्पर जायचं म्हणजे आत्ताच टाकलं पाहिजे दप्तरात. कोणतं नेऊ? कवितांचं नेते. आईला वाचून दाखवता येतील.

आज सुमीने काय सांगितले, कुमुद्च्या लग्नाची तारीख. ५ फेब्रुवारी ठरली आहे. अजून अवकाश आहे. ही कार्टी परीक्षा देणार का माहित नाही. निदान परीक्षा झाल्यावर घरच्यांनी तारिख काढायची ना. तेवढाच इंटर झाल्याचा शिक्का मिळाला असता. या बाईसाहेबांना पण घाई किती? काहीच म्हटले नसेल तिने. जाऊ दे तो विषय. सगळं ठरल्यावर नाहक चर्चा आणि काळजी करण्यात आता काहीच अर्थ नव्हता. आज कविता काय कुठल्याच ओळी आठवत नाही, विचारांच्या कल्लोळात सारे शब्द थिजून गेले असं वाटतं आहे.

२०/११/१९७५

आईच्या तपासण्या सुरु झाल्या. गुडघ्याला जब्बर मार लागला आहे. इतरही हाडांना मार लागला आहे. त्यामुळे ती हाडं जुळेस्तोवर ऑपरेशन करता येणार नाही. डॉ.पेंढारकरांनी मला आईचे एक्स-रे रिपोर्ट दाखवले आणि समजवून सांगितले. अर्थात ते समजवून घेण्याचा पुढाकर मीच घेतला होता. आईला भेटायला येणारे-जाणारे यांची रीघ लागली होती.

परवा मी डायरी दवाखान्यात नेली. जो तो बघायला मागतो. तेव्हा ठरवलं वेळ मिळेल तसं लिहिणार पण कोणाला दाखवणार नाही. सुमीला तेवढं माहिती आहे आणि अर्थातच आई-बाबांना. त्यांनीच तर आपलं स्वातंत्र्य आणि विचार स्वातंत्र्याची जपण्याची सवय मला लावली. माझ्या सोबतच्या इतर मुलींना बघून मला अधेमधे असं उगाच वाटतं की मी इतर मुलींसारखी शामळु, लाजाळु, आपल्या भावना आपल्यातच कोंडणारी नाहीच. आपलं म्हणणं सडेतोड मांडणं आपला हक्क आहे का? हे मला माहित नाही पण मी जरा जास्तच धीट आहे हे मला इतरांच्या बोलण्यावरुन कळायला लागलं आहे. थोडक्यात इतरांकडून मी नेमकी कशी आहे याचा मला शोध लागत रहातो असाच अधूनमधून.

२८/११/१९७५

आईचं ऑपरेशन झालं. आईला असं अंथरुणावर लाचार बघवत नव्हतं. तिला होणारा त्रास मला आणि बाबांना होत होता. तेव्हाच मी ठरवलं आता आईशी कध्धी कध्धी अबोला धरणार नाही. ती बरी होऊन लवकरात लवकर घरी यावी ही एकच इच्छा आहे. ही इच्छा पूर्ण होण्यासाठी मी आजकाल कॉलेजच्या पटांगणातल्या देवळात रोज जाते. हात जोडतांना मला उमगलं की ईश्वर जे आजवर माझं केवळ श्रध्दास्थान होतं ते आज माझं शक्तीस्थान आहे. देवा, समजण्याची, समजून घेण्याची शक्ती तू मला दिली, तू आज माझा आधार झाला, मला कुठल्या क्षणी कोसळू दिलं नाही, तुझे कितीही नाव असलेत तरी माझ्यासाठी तू मला सावरणारी एक दिव्यशक्ती आहे. तुझ्यापुढे बसलं की असं वाटतं की न सांगताच तुला सारं काही कळलं आहे. मनातून मळभ आपोआप दूर होतं. मी कोण होते? नास्तिक? श्रध्दाळु? नाही मी आजच आस्तिक झाले. आजच्या ओळी. समितीत आम्ही साने गुरुजींची एक प्रार्थना म्हणतो त्यातील आहे:

नको माझे अश्रु    कधी नेऊ देवा
हाचि थोर ठेवा    माझा एक    ॥
बाकि सारे नेई    धन-सुख-मान
परी हे लोचन    राखी ओले    ॥
माझे रुप मज    अश्रु दावितात
हेचि तातमात    प्राणदाते    ॥

२/१२/१९७५

आत्या आणि मावशी आईचे ऑपरेशन व्यवस्थित झाले बघून आपाआपल्या घरी गेल्यात. आईला दवाखाण्यातून सुट्टी होईल त्या दिवशी त्या परत येणार होत्या. आता घरची सर्व जवाबदारी माझ्या अंगावर पडल्याची जाणीव मला होत होती. खरंच परिस्थिती माणसाला खूप काही शिकवते याची प्रचिती मला आली. अशा विकट परिस्थितीला सामोरे जाण्यासाठी लागणार धैर्य आणि बुध्दी मला माझ्या आईबाबांनीच दिली मैत्रिणी-नातेवाईक-शेजारचे यांच्या मदतीने मी घर-कॉलेज-दवाखाना-अभ्यास हा सारा व्याप कसोशीने सांभाळत आहे.

१०/१२/१९७५

आज आईची दवाखाण्यातून सुट्टी झाली. मलाच खूप बरं वाटलं. सुमी तर सावलीसारखी बरोबर होती. तिने मला खूप सावरलं. सुमीला मी न सांगताच माझं सारं काही कळतं....

सुधा आजी, नरुमावशी, गौराबाई सगळ्यांनीच खूप मदत केली. आई येणार म्हणून मी गौराबाईच्या मदतीने घर आवरुन ठेवलं. घरी आल्यावर आई म्हणाली कशी, माझी चिमणी आजकाल चीवचीव करत नाही का? तर आत्या लगेच कशी म्हणाली आपली मैना आता मोठी झाली वहिनी. आत्यानी आईला माझ्याबद्दल काय काय सांगितलं ठाउक नाही, पण आईच्या डोळ्यांत एक वेगळंच समाधान बघितलं मी आज. मलाही छान वाटलं ते समाधान बघून. माझं मलाच जाणवलं इतक्यात मी मोठ्यांसारखी वागत होते.... कदाचित बाबा म्हणाले तेच बरोबर. परिस्थिती माणसाचा अदृष्य गुरु आहे. या गुरुने मला बरेच काही शिकवले यात शंकाच नाही. सगळ्यांच्या नजरेत कौतुक बघून देवाने मला शहाणपण लवकर दिलं का? मला उगीच वाटून गेले. असो...आज केशवसुतांची घड्याळ कवितेच्या ओळी आठवून गेल्यात:

गडबड घाई जगात चाले
आळस दुलक्या देतो पण
गंभीरपणे घड्याळ बोले-
आला क्षण गेला क्षण.....
..... आनंदी आनंद उडाला
नवरीला वर योग्य मिळाला
थाट बहुत मंडपात चाले-

भोजन,वादन,नर्तन,गान
काळ हळू ओटीवर बोले-
आला क्षण गेला क्षण

माझ्या आयुष्यात अजून कसले क्षण येणार कोणास ठाऊक? घड्याळ्याच्या काट्यांवर आपले आयुष्य असेच पुढे पुढे जात रहाणार.

१०/१२/१९७५

खूप दिवसांनी आमचं रोजच बस्तान बसलं. सारे नेहमी प्रमाणे कामाला लागले. आईच्या तब्येतीत बरीच सुधारणा होत आहे. शेजारच्या सुधाआजी सोबत शेजारच्या आळीतील काही बायका आईची तब्येत बघायला आल्या. आईला ती अंगणात कशी पाय घसरुन पडली हे सांगतांना खूप वैताग आला होता. सहाजिकच आहे. तीच कथा रोज सर्वांना सांगत बसायची. भेटायला येतात त्यांना माहिती असतांना, तेच ते ऐकून काय नवीन मिळत ठाउक नाही. काय गम्मत आहे ना....

जगण्यातल्या या गमती मला आता कळायला लागल्या होत्या. सुमी वरचेवर येऊन जाते. आईच्या आजारपणात समिती सुटली. आचार्यबाई भेटायला येऊन गेल्यात. बाकी ओळखीच्या मंडळींची चक्कर असतेच. घरातलं काम वाढलं आहे. याचा परिणाम म्हणजे माझं अभ्यासात लक्षं लागत नाही. परीक्षा जवळ आली आहे. अभ्यासाला लागलच पाहिजे. बाबांना आईच्या आजारपणाचा शारिरिक नव्हे तर मानसिक थकवा आला होता. हे माझ्या लक्षात आलं. आपल्या अगदी जवळच्या माणसाला काही दुखापत झाली की जीव कसा कळवळतो. असो, माझ्या वागण्यातला बदलं सर्वांनाच जाणवला बहुधा. माझं घरभर धावणं सतत मस्ती करणं एकाएकी बंदच झालं. शेवटी आई चिडून म्हणाली....ए मैने एवढं पोक्त व्हायची गरज नाही हं! मला माझी पूर्वीच्या गार्गीची एखादी झलक तरी पाहू दे. बाबांनीही याला दुजोरा दिला. परत आमचं घर हसू-खिदळू लागलं.

आजच्या ओळी खास माझ्या आईसाठी : कवि यशवंत यांची आई कविता

आई ! तुझ्याच ठायी सामर्थ्य नंदिनीचें
माहेर मंगलाचे अद्वैत तापसांचे

गांभीर्य सागराचे औदार्य या धरेचे
नेत्रात तेज नाचे त्या शांत चंद्रिकेचें
वात्सल्य गाढ पोटी त्या मेघमंडळाचे
वास्तव्य या गुणांचे आई, तुझ्यात साचें

११/०१/१९७६

कॅलेण्डरवर नवीन वर्ष केव्हा सुरू झालं कळलच नाही. समितीचा कॅम्प यंदा यवतमाळला आहे. आईच्या आजारपणामुळे मला जाता येणार नाही.

सुमी हल्ली अबोल झाली आहे. सारखं वाटतय तिला काही तरी सांगायच आहे. सुहास आणि सुमी प्रकरणाचा छडा लावायच राहून गेलं. ते माझ्या नकळत परस्परांना भेटतात. हे मला कळलं होत. ते मी फार मनावर घेतलं नव्हतं. हल्ली सुहासदाच्या बोलण्यात तिचा बरेचदा उल्लेख असतो. अरे नाही, तो माझ्याशी फक्त तिच्या विषयावरच बोलतो. हे मला आधी कसं कळलं नाही. मी किती बावळट आहे याची आज मला प्रचिती आली. साधी शंका माझ्या मनात येऊ नये म्हणजे काय? उद्याच सुमीला गाठायच आणि थेट विचारुन टाकायचं... मग ठरलं तर.

१५/०१/१९७६

“सुमे कुमुदसाठी रुखवंताच काय काय केलं? एक माझ्या नावाचं करुन टाक.” मी तिला काही तरी विचारायचं म्हणून विचारले. खरं तर मी सुहासदाच्या विषयाला कशी सुरवात करु या संभ्रमात.

"हो मला माहितच होतं बाईसाहेब, नशीब पाच तारखेला विचारले नाही ते" कुचकटपणे ती बोलली. आपल्या कलाकुसरीचे नमुने माझ्या पुढ्यात आणत म्हणते कशी “उचला कुठलं हवं ते.”

हे तू एकटीने केले की....कुमुदचीच मदत घेतली का? मी चेष्टेने बोलली.

तिला तो नेहमीसारखा लटका राग यावा या प्रयत्नात मी होते. ओढत, ताणत, गप्पांमधे गुंतवत मी तिला गच्चीवर आणलं. सुहासदादा आला आहे....हे म्हणताच स्वारीच्या चेहरा पहाण्यासारखा झाला. तिच्या डोळ्यातली आतुरता मी टिपताच तिला माझा हेतू लक्षात आला. आणि काय मस्त लाजली सुमी.

व्वा! सुमीने कबूल केले. पठ्ठीने केवढा वेळ घेतला हे सांगायला. आता सुहासदाला गाठायला पाहिजे. या दोघांच्या प्रेमकथेचा आनंद त्यांच्यापेक्षा मलाच अधिक झाला. कदाचित माझ्या आयुष्यातील आणि माझ्या समोर घडणारी पहिली वहिली प्रेम कहाणी आहे. संध्याकाळी सुहासदाला मी बोलावलेच होते. प्रेमाची कबुली कोणी कोणाला पहिले दिली? मी हे विचारताच दोघं एकमेकांकडे बघू लागलेत.

८/०२/१९७६

परीक्षा जवळ आली या विचारात मी अभ्यासाला लागले. आजच कुमुदची मांडव परतणी झाली. गेला आठवडा कुमुदच्या लग्नाच्या धावपळीत गेला. खूप धमाल केली आम्ही मैत्रीणींनी. राहून राहून मला कुमुदची सासरची मंडळी खटकत होती. नवरा मुलगा कुमुदपूढे जरा मोठाच वाटत होता. घेणं-देणं यावरुन वरातीत बरीच चर्चा झाली असावी, मला त्यात रस नव्हता म्हणून मी फार लक्ष दिले नाही. त्या सबंधी काही गोष्टी कानावर आल्यात. सुमीच म्हणणं तिचं लग्न तू मनापासून स्विकारलं नाही म्हणून तुला असं वाटत असावं. देव करो आणि सगळं चांगलं होवो.

कुमुदवर फार विचार करायचा मी टाळत होते. कारण त्याचा मला विचार न करताही त्रास होत होता.

एक अनामिक भय त्या विचारांसोबत मला घेरुन टाकतं. मी सुमीशी आणि सुहासदाशी पण बोलले, दोघांनी मला उडवून लावलं कागदी विमानासारख. मलाही वाटलं कदाचित हे माझ्या मनाचेच खेळ असतील .

"आता अभ्यासाला लागले पाहिजे. परीक्षा जवळ आली आहे." मी माझ्या विचारांना वळते करायचा प्रयत्न करीत होते.

२५/०३/१९७६

आज बरेच दिवसांनी आईला अंगणात फिरतांना बघून छान वाटलं. शेजारच्या सुधाआजीकडे त्यांची मुलगी आणि त्यांचा नातु..नात खूपसे पाहुणे आले होते. आईनी त्यांच्या कडे श्रीखंडाचा चक्का नेऊन द्द्यायला सांगितला. ते उद्या संध्याकाळी चहापानासाठी येणार हे आईने आत्तापर्यन्त मला दहावेळा तरी सांगितलं. “तू आजारपणातून नुकतीच उठली आहे हे कळतं त्यांना” हे मी आईला शंभरवेळा सांगून उपयोग झाला नाही. चहासोबत पोहे आलेच. मी चक्का द्यायला गेले तेव्हा अंगणात एक उंच सावळासा रुवाबदार मुलगा पुस्तक वाचत होता... कोण होता तो? अर्चना आत्याला नमस्कार करून मी निघणार तोच ती म्हणाली प्रसन्नाला भेटलीस का? म्हणजे तो प्रसन्ना होता तर. मी ओळखलंच नाही त्याला. लहानपणी आम्ही खूप खेळायचो. प्रसन्नाची इंटरची परीक्षा आटोपली आणि इथे सुट्ट्यांमधे राहून तो एन.डी.एची प्रवेशपरीक्षेची तयारी करणार, तेवढीच सुधाआजीला सोबत होईल. सुधाआजीच्या आनंदाचं रहस्य हे आहे. “म्हणजे मला विसरणार का आजी” मी गमतीने म्हंटले. तर आजी म्हणते कशी “आधी त्याला पूर्ण वर्धा दाखव कामं समजवून सांग मग मी विसरेन तुला.” सारेच जण हसलो.

“ओके तर ही ती चिंगी मला वाटलच......” प्रसन्ना स्वयंपाकघरात येत म्हणाला. "चिंगी" ऐकून मी त्याच्याकडे रागाने बघितले तर म्हणतो कसा अजूनही तू मारक्या म्हशी सारखी बघते. आमचा प्रेमळ संवाद आईच्या हाक मारण्याने लवकर संपला. तू येच घरी...मग दाखवते तुला इंगा....प्रसन्नाला मी वॉर्निंग देऊन आले.

२६/०३/१९७६

"प्रेमा काय देऊ तुला...भाग्य दिले तू मला..."कवितेऐवजी मराठी गाण्याच्या ओळी माझ्या ओठावर कशाकाय आल्या? आज काही वेगळच वाटतय. मी सारखी प्रसन्नाबद्दल का विचार करतेय? तोच ज्याच्याशी मी लहानपनी खूप भांडायची, मारामारी करायची. सारखा त्याचा बोलका चेहरा डोळ्यासमोर येतो आहे. त्याने मला चिंगी म्हंटले तरी फारसा रागही आला नाही. मी हट्टाने इतक्या वर्षात कोणालाच चिंगी म्हणू दिले नाही.

कशामुळे आज मला माझ्या डायरीत काय लिहावं हे सुचत नाही. कुठल्याच कवितेच्या ओळी आठवत नाही.. आठवलं ते गाणं.

१/४/१९७६

आज प्रसन्नाने मला एप्रिलफूल बनवलं. मला थोडासाही राग आला नाही. तो रोज त्याच्या वडिलांचे मिलिटरीतले किस्से, आई सोशल वर्कर तिच्याबद्दल, कधी कॉलेज, त्याचे मित्र याबद्दल नेहमीच सांगत असतो. तो लहान असतांना एकदा त्याच्या आईने एका नेपाळी अनाथ मुलाची सोय होत नाही म्हणून चक्क घरीच आणले. तो त्यांच्या सोबत आठ दिवस राहिला. त्याच्या खोड्या प्रसन्नाने सांगितल्या- त्याला नाक नाही, मला असा भाऊ नको म्हणून तो आईशी खूप भांडला. लहानपणी तो आई सोबत खूप फिरायचा. आई एका मिटींगमधे बिझी आहे बघून त्याने वॉचमनची खूर्ची लपवून ठेवली. सतत खोड्या, सतत मस्ती. एकदा एका पार्कमधे खेळायला गेला आणि झाडावर चढून बसला ते खाली उतरायलाच तयार होईना, शेवटी आईसक्रीमचे आमिष दाखवून खाली उतरवले.

मुंबईला एका अपघातात त्याच्या वडिलांचा एक पाय निकामी झाला होता. याबद्दल प्रसन्ना नेहमीच खंत व्यक्त करत असे.

त्याच्या लहानपणीच्या आणि कॉलेजच्या खोड्या ऐकून मी खूप हासायची.

२९/३/१९७६

प्रसन्ना, नावाप्रमाणेच प्रसन्न आणि हसरा मुलगा. माझी आणि त्याची छान मैत्री जुळली. त्याला वर्धा दाखवायच्या निमित्ताने मी त्याच्या सोबत खूप फिरते. तो एन.डी.ए ची तयारी करत आहे. हल्ली रोज कॉलेजपर्यन्त मला आणि सुमीला सोबत सोडायला येतोय. का कोण जाणे तो सोबत यावा असे मला वाटू लागलं आहे. झालं पुढच्या आठवड्यात कॉलेजला सुट्ट्या लागतील अणि परीक्षा.....

आपण विचार बदलण्यासाठी काय काय करतो आणि परत तेच विचार फिरुन येतात. मीही किती प्रयत्न केला तरी प्रसन्नाचा विचार डोक्यातून जातच नव्हता. मात्र हे विचार झटकून अभ्यासाला लागलं पाहिजे. चांगले मार्क मिळालेच पाहिजे. मेडिकलला जायचं आहे.

आई-बाबांचं स्वप्न पूर्ण करायचं आहे. या जाणीवेकडे वळून मी बळे बळे प्रसन्नाच्या विचारांचा निरोप घेतला.

१५/४/१९७६

हे दिवस कसे सरले ते कळलेच नाही. अभ्यास-परीक्षा आणि प्रसन्ना काही काळ माझं हेच जग होतं.

परीक्षा संपली एकदाची आणि मी या जगातून बाहेर आले. सिनेमाला जायचा कार्यक्रम ठरतोय. नेहमीप्रमाणेच प्रत्येकाच्या आईवडिलांच्या मनधरणेत वेळ जाईल. कुमुदचं पत्र यावेळी सुमीकडे आले. उद्द्या वाचू, तसं मागच्या पत्रात विशेष काही लिहिलं नव्हतं. उन्हाळ्यात येईल असाच उल्लेख होता. प्रत्येकाचे सुट्टीचे बेत ठरत होते. मी दरवर्षीप्रमाणे काही दिवस आत्याकडे आणि मावशीकडे जाऊन येणार. रमाकांतकाकांची बदली यवतमाळला झाली. बहुतेक मावशीसोबत तिचं घर लावयला जाईन म्हणतेय बघू. प्रसन्ना ट्रेकिंगला गेला आहे. तो आल्यावर ठरवू.

मी प्रसन्नात गुंतत चालले हे माझ्या लक्षात नाही आलं, ते लक्षात आणून दिले ते सुमीने.

काय प्रत्येक गोष्ट हल्ली तू प्रसन्नाला विचारुन करतेस? सुमीने माझ्यावर टोमणा हाणलाच. तू नाही का सुहासदाला विचारुन करतं. मी म्हटल्यावर म्हणते कशी आम्ही प्रेमाची कबुली दिली एकमेकांना. आपण उरकलेत का हे विधी? आम्हाला न सांगता परस्पर. तेव्हा माझ्या लक्षात आलं प्रत्येक गोष्ट मी त्याला सांगूनच करतेय. अर्थात नकळत घडत गेलं आणि मला आज उमगलं.

१७/४/१९७६

कुमुदचं पत्र मी आणि सुमीने वाचले. पण वाचून तिला आमचे पत्र मिळत नसल्याचे कळल्यामुळे दोघी विचारात होतो. तिच्या वहिनीला घरी गाठायच ठरवलं. उगीच काहीतरी बिनसल्याची मला कुणकुण वाटत होती. तिच्या घरुन फार काही कळलं नाही. कुमुद ठीक असेल ना? याच काळजीत आम्ही दोघी होतो. ती इतक्या दूर परभणीला जाउन बसली. तिथून तिची खबरबात तरी कशी मिळवायची?

प्रसन्नाशी बोलू या विषयावर. तो तरी कुठे आलाय ट्रेकिंगवरुन?

कुमुदने लग्नाची घाई केली याची रुखरुख नेहमीच असायची. तिच्या या निर्विकार पत्रामुळे ती अजूनच वाढत गेली. कोणाला बोलायचं, तिच्या आईवडिलांना विचारलं तर ते ती खुशाल असल्याचं कळवतात. ती संसारात इतकी गुंतली की तिला आम्हाला काहीच लिहावंसं वाटलं नाही. तिचा नवरा, त्याच्याबद्दल तिने कधीच काही लिहिलं नाही. मलाही तेव्हा आईच्या आजारपणामुळे कुमुदशी फार बोलताही आलं नाही. मी आणि सुमी तिच्या काळजीत होतो. इतक्यात काही सणवारही नाहीत की ती त्या कारणाने वर्धेत येईल. इकडे आठ दिवसात येतो सांगून गेलेला प्रसन्नाचा ही पत्ता नव्हता.

१९/४/१९७६

प्रसन्ना कालच यायला हवा होता. वाट बघण्यात हूरहूरणं नकळत मला आवडायला लागलं होतं. आजची संध्याकाळ अशीच वाट बघण्यात गेली. त्यालाही माझ्याबद्दल असंच वाटत असेल का? या विचारांत तिन्ही सांजेला मावळतीचा सूर्य बघताच बा.भ.बोरकरांची कविता आठवून गेली.

फांदीसारखी झुकते सांज, जांभळासारखे पिकती ढग
हवेत गारवा जड होउन पेंगुळपांगुळ होते जग
गगनभरल्या आठवणींचे गर्द झाडींत शिरते थवे
ओला काळोख आळत येतो उकत्याझाकत्या काजव्यांसवे
अशा वेळी दूरचा दिवा जवळ येतो पाण्यावरुन
वारा तारा छेडीत घुमतो उदास उदास सूर भरुन
डोळ्यांमधे जमते पाणी : कशासाठी कळत नाही
उरभरल्या उसाशाला कुठेच वाट मिळत नाहीं

आज माझी अशीच अवस्था आहे. माझ्या डोळ्यात पाणी आलं खरं, का आलं? मलाच कळत नाही.

मनाची घालमेल का चालली ते कळत नाही. एरवी सडेतोड, निर्भिड मी, आज एखाद्या ऋषिकन्येप्रमाणे गोगलगाय होऊन प्रश्नांचा गुंता सोडवत बसली, असं माझं मलाच वाटत आहे. कोणाला सांगता येत नाही आणि मनात कोंडून ठेवता येत नाही. अशा दुहेरी मनस्थितीत मी पार अडकली आहे. अशा भारावलेल्या क्षणांत आईबाबा..सुमी..कुमुद...कुठल्याच विषयांवर विचार करावसा वाटत नाही.

२१/०४/१९७६

प्रसन्ना आज आला. तो आल्या आल्या माझा लटका राग त्याला दाखविण्याची काय गरज होती. नकळत मी असं करुन बसली. आता वाटतंय त्याला तेव्हाच चांगलं खडसावून विचारलं असतं. माझा मूळ स्वभाव वाढत्या वयासोबत बदलत चालला का? का तो प्रसन्ना आहे म्हणून मी त्याच्याशी रोखठोक बोलू शकली नाही. असो, सुमी म्हणाली "काही दिवस वाट बघ. नंतर सरळ तुच त्याला तुझं त्याच्यावर प्रेम आहे सांगून टाक." हे वाटतं इतक सोप्प आहे?....मला जमेल? माझा धीटपणा कुठे गेला? या एका गोष्टीचा माझ्यावर इतका परिणाम व्हावा की माझा आभ्यास, माझं डॉक्टर व्हायचं स्वप्न या सगळ्याचा मला विसर पडला. अंतर्मनातील या विचारांच्या लहरींना मी दूर सारण्याचा मी खूप प्रयत्न केला, सगळे प्रयत्न व्यर्थ ठरलेत, परत फिरुन तेच विचार मनात येत आहेत.

कळा ज्या लागल्या जीवा मला की ईश्वरी ठाव्या!
कुणाला काय हो त्यांचे ? कुणाला काय सांगाव्या?
उरी या हात ठेवोनी उरीचा शूल कां जाई ?
समुद्री चौंकडे पाणे, पिण्याला थेंबही नाही,.....
........पुढें जाऊं ? वळूं मागें ? करुं मी काय रे देवा?
खडे मारी कुणी, कोणी हसे, कोणी करे हेवा!

भा.रा.तांबेंच्या कळा ज्या लागल्या जीवा यासारखी माझी अवस्था झाली आहे. विचारांच्या वलयात मला एक गोष्ट लक्षात आली आपण अगतिक असता देवाची आठवण नकळत होते. अशीच देवाची आठवण मला आईच्या ऑपरेशनच्या वेळेस आली होती.

माझ्यासाठी ईश्वर कधीच कुठले एक नाव नव्हते. माझ्या कुटुंबाचे आराध्य दैवत जरी

तुळजाभवानी असली तरी माझ्यासाठी माझा देव म्हणजे एक सात्विक शक्ती आहे. मी कुठल्याच देवतेची पूजा करत नाही. मात्र माझ्यात नांदणारी चिरंतन शक्ती त्यापुढे मी नेहमीच नतमस्तक होते. माझा देव माझ्यातच खोल मनात कुठेतरी दडून बसला आहे. त्याला ठाऊक आहे मी अगतिक झाले की त्याचे नाव माझ्या ओठावर आपोआप येईलं, याचीच तर तो वाट बघतं आहे. तुझ्या दु:खात, तुझ्या एकटेपणात तुझ्यासोबत कोणी नसले तरी मी आहे याची जाणीव मला तो नेहमीच करून देतो. माझा देव आणि दैव आयुष्याच्या कुठल्या मार्गावर आणून सोडतो ठाऊक नाही. का कोण जाणे हा विचार करताच एका अनामिक भितीने माझे सर्वांग शहारून गेले.

२७/०४/१९७६

प्रसन्नाच्या डोळ्यात मी काहीतरी शोधत होते आणि तो माझ्या डोळ्यात. दोघांनाही ठाऊक होते. पण प्रेम व्यक्त कोणीच करत नव्हते. अशा अव्यक्त प्रेमात गुंतणे त्यालाही आवडलं असावं, मला तर आवडतच होतं.

एकमेकांच्या सहवासात आम्ही बरेच दिवस घालवलेत. खूप गप्पा मारल्या. यातून आम्ही एकमेकांच्या अधिक जवळ येत होतो. सुमी मला समजवून थकून गेली. हे अव्यक्त प्रेम कधी तरी व्यक्त होणार, तो एक दिवस येणार, आतुरतेने मी त्या दिवसाची वाट बघत आहे.

४/५/१९७६

आज सुहासदा भेटायला आला होता. परभणीला त्याच्या कोणी ओळखीचं त्याला सापडलं. सुमीने विचारलेच कोण? मला खरं त्यात काही रस नव्हता. मला फक्त कुमुद बद्दल जाणून घ्यायचे होते बस्स. त्याच्या मित्राच्या वहिनीच माहेर परभणीच होतं. सुमीने त्याला रागावूनच विचारले आधी नाही का सांगायचे?

असो, त्यांना कुमुदच्या सासरची संपूर्ण माहिती दे आणि बातमी काढायला सांग ना. सुमीने फरमान काढलं.

"ए बयाबाई...मी ते आधीच सांगितलं, वहिनींचा भाऊ आला आहे सारंग. त्याच्याशीच ओळख करुन देत होता तेव्हा लक्षात आलं, कुमुदबद्दल त्याला माहिती आहे का विचारावं. तो परवा जाणार आहे परभणीला.. धीरेनभाईंच्या दुकानात दुपारी साडेचार वाजता फोन करणार आहे." सुहासदाने एका दमात सगळं सांगून टाकलं.

....मी आईशी बोलते आपण दोघी जाऊ कुमुदकडे भेटायला....मग ठरलं तर

प्रसन्ना आणि सुहास धीरेनभाईंच्या दुकानातून परस्पर निरंजन दादाकडे येणार होते.

८/५/१९७६

ठरल्या प्रमाणे आज आमचे मिशन कुमुद यशस्वी झाले. जे आम्हाला कळलं ते इतकं विदारक होतं की मन आणि बुध्दी दोघांना ते पटत नव्हतं. तिच्या आईबाबांना भेटू का? मग तिच्या दादा-वहिनीला भेटून कानावर घालू असं ठरलं. मी कुमुदच्या लग्नाबद्दल आधीच बोलले असते तर? तेव्हा कुठे हे माहित होते? आपल्याला वाटले तिच्या आईवडिलांनी मुलाकडची चौकशी केलीच असेल ते. माझ्या मनातील शंका अशी खरी ठरेल स्वप्नात पण वाटले नव्हते. ते उगाच त्या क्षणी मला वाटून गेले आणि मी बोलून गेले. माझी चुक काय?

प्रसन्नाला माझ्या मनाची घालमेल कळली. "हे सगळं खरं आहे म्हणून तुला असं वाटतं आहे. समजा हे खरं नसतं तर उगाच कुमुदच आयुष्य आपण दुषित केल्याची खंत तुला जन्मभर पुरली असती." झाल्या गेल्याचा विचार करु नको. निदान तुझ्याकडून मला ते अपेक्षित नाही. त्याच्या या अधिकाराने बोलण्याचे मला नवल वाटले. किती खरं बोलला तो.

१०/५/१९७६

आज माझ्या घरी कुमुदच्या आई-वडिलांना आणि दादा-वहिनीला बोलावून सगळं सांगितलं. त्यांचा विश्वास बसत नव्हता. मग ठरलं खरं खोटं तपासून बघण्यासाठी निरोप न देता कुमुदचा भाऊ, निरंजनदादा, सुहासदा आणि कुमुदचे काका परभणीला जातील. संगीता वहिनीने त्यांच्या माहेरचा पत्ता दिला. माहेरी फोन करून सांगितलं. येत्या पंधरा तारखेला जायचं ठरलं. मला आज माझ्या आई बाबांचा अभिमान वाटला. त्यांनी माझ्या मैत्रीसाठी मी म्हटलं तसं केलं. माझ्याप्रमाणे त्यांनाही कुमुदची काळजी वाटत होतीच. या प्रकरणात संगीता वहिनीने खूप मदत केली.

१२/०५/१९७६

सुधा आजीच्या गच्चीवर आम्ही दोघं मावळतीचा सूर्य बघत बसलो होतो. दोघंही निशब्द. आज दोघांच्या मधे शब्दही नकोसा झाला. सतत एकमेकांच्या भेटीसाठी बोलण्यासाठी आतूर असलेलो आज आम्ही निशब्द का होतो हे आम्हाला तरी कुठे माहिती होते. कुमुदबद्दल खूप काळजी वाटते का? प्रसन्नाने बोलण्याचा प्रयत्न करत म्हटलं. त्या विषयी माझी बोलण्याची इच्छा नाही हे जाणून तो बोलायचा थांबला. राहू दे कोणीच बोलू नाही. तू, मी आणि शांतता छान वाटतंय. त्यालाही इतर कुणाबद्दलही विचार करायची इच्छा होत नव्हती. संधिप्रकाशाची चाहूल लागताच केशरी-नारंगी छटा आकाशात विखुरल्या आणि प्रसन्नाने माझा हात हातात घेत त्याच्या प्रेमाची कबुली दिली. मी ही लगेच दिली.....की (आपोआप आली). माझा आनंद माझ्यातच मावत नाहीय. ज्या क्षणांची मी वाट बघत होते तोच क्षण माझ्यासमोर उभा आहे. तो क्षण चिरंतन इथेच गोठून जावा मला वाटत आहे. आज या क्षणात मलाच कवितेच्या काही ओळी स्फुरल्यात :

केशरी सांज यावी अन
माझी तुझी भेट व्हावी
दिस-रात क्षितीजावरती
तू अन मी काठावरती
नदीत अंधुक साउली पडावी
तुझी माझी भेट व्हावी

पाउले वाजता स्वप्नांची

माझी तुझी भेट व्हावी
प्रेमगीताच्या तालावरती
ओठ तुझे माझे भिजती
अंगअंग शहारुन जाता
तुझी माझी भेट व्हावी
मंतरलेल्या या अवस्थेत मला एवढ्याच ओळी सुचल्यात...

१५/५/१९७६

निकालाचे दिवस जवळ येत आहेत. हा विचार मनात जरी आला तरी एक अनामिक भिती दाटून येते. मेडिकलमधे प्रवेश मिळेल ना? पण छे, हा विचार केला तरी प्रसन्ना डोळ्यापुढून हलतच नाही. कित्तीदा त्याचे विचार झटकलेत तरी राहून राहून प्रसन्ना डोळ्यापूढे येऊन या विचारांमधे व्यत्यय आणतो. हळूहळू स्वप्नात गुंगणं मला आवडायला लागलं.

आणि नकळत मी कालची कविता आज पूर्ण केली :

उमलता पाकळी फुलांची
माझी तुझी भेट व्हावी
मृदु गंधाची चढता बेधुंदी
आभास तुझा धरा-अंबरी
भास-आभासाच्या गुंग धुंदीत
तुझी माझी भेट व्हावी

उकलता गुंफण स्मृतींची
माझी तुझी भेट व्हावी
गुंफता गुंफता गोफ अंतरी
भेट आपुली आसुसलेली
अशीच मंतरलेली रोज नव्याने
तुझी माझी भेट व्हावी

नचिकेत हे वाचून स्तब्ध झाला होता. त्याला यावर काय रिॲक्शन असावी हेच सुचत नव्हते. मात्र तो डायरीतील कथानकात गुंतत होता. डायरीतील नावांचे संदर्भ त्याच्या वर्तमान आयुष्यात अद्याप जुळत नव्हते. डायरीतील गार्गी आणि त्याची आई गार्गी यात खूप फरक होता. माझी आई साधी-सरळ-अबोल-गोरी-समंजस आणि डॉक्टर तर नव्हतीच आणि हे देवदत्त खानोलकर कोण? लहानपणी हे नाव ऐकल्याच त्याला पुसटसं आठवत होतं. नेमकं काही आठवत नव्हतं. "सुमी" अधूनमधून आजी आपल्या आईला म्हणते. सुन्न झालेल्या नचिकेतला नात्यांचा गुंता सोसत नव्हता तसा तो सुटत ही नव्हता.

परत परत सारे जुने फोटो बघून काही लक्षात येत नव्हतं. सुहास हे नाव त्याच्या वडिलांच पण तरीही कुठलेच धागेदोरे जुळत नव्हते. अनु शांत झोपली होती.

तिच्या बोलण्यावरुन त्याचा या सर्वांशी संबध होता पण नेमका केव्हा? कुठे?कसा? या प्रश्नांची उत्तरे तो शोधत होता. नात्यांचा गुंता उकलतं नव्हता. वेगवेगळे अंदाज मनात सारखे घुटमळत होते. नचिकेतने परत डायरीचे पानं वाचायला सुरवात केली...

ही आगळी वेगळी प्रेमकहाणी ..."केशरी सांज यावी..तुझीमाझी भेट व्हावी "या ओळींनी त्यालाही मंत्रमुग्ध केले होते.

१७/५/१९७६

आज परभणीहून सारे जण परतलेत हे सुमीकडून कळताच मी काम सोडून कुमुदचं घर गाठलं. कुमुदनी दारातच मला मिठी मारली आणि धाय मोकलून रडायला लागली. तीन महिन्यांचा साठलेला आक्रोश आज तिच्या डोळ्यातून वाहत होता. कुमुदची अवस्था फारच वाईट होती. चेहरा ओढलेला, खचलेली, आणि भेदरलेली पाहून घरातील कोणाचेच अश्रु थांबत नव्हते. काका-काकू दादा- वहिनी सारेच स्तब्ध होते. सुमीने तिला सावरत आत नेले. कुमुदची अवस्था बघवत नव्हती. मानसिक आणि शारिरिक यातनांच्या खुणा तिच्या अंगभर दिसत होत्या. आईवडिलांना पश्चाताप होत होता. कोणाचं प्राक्तन दीन असू शकेल पण इतकं क्रुर आणि निर्दयी असू शकतं याच्यावर माझा विश्वास बसत नव्हता. माझं मन विषण्ण झालं होतं.. एका क्षणात माझ्या ईश्वरनिष्ठा, भाग्य, दैव या संकल्पनांना तडा गेला होता. सत्य कडू असतं तर ते पचवता येईल एकवेळ, जर सत्य भयानक आणि विदारक असेल तर?

१६/५/१९७६

आज प्रसन्ना एन.डी.एच्या परिक्षेसाठी पुण्याला निघाला. आमचा हात हातातून सुटतं नव्हता. प्लीज़ रडू नको, त्याच्या सांगण्यावरुन मी माझे अश्रु हृदयात कोंडण्याचा प्रयत्न करत होते. आणाभाका, पत्र लिहिण्याचं वचन डोळ्यातूनच सगळी देवाण घेवाण झाली. माझा निकाल लागे पर्यन्त थांबला असता. गार्गी उगाच काही बोलू नको तुला माहिती आहे माझं ध्येय तुझ्या ध्येया इतकच महत्वाचं आहे. माझं आणि माझ्या आईबाबांचं स्वप्न मला पूर्ण करायचं आहे. आम्ही दोघं दोन किनारे असच मला या क्षणी वाटत होतं. आता आपण कधी भेटणार? कुठे? कसं भेटणार? या नाहक प्रश्नांनी माझी दैना केली. आणि नको नको म्हणतांना तो क्षण आलाचं.

माझ्या आयुष्यात एकाएकी पोकळी तयार झाल्यासारखी वाटली.

४/६/१९७६

मधले दिवस कसे गेले कळलेच नाही. कुमुदला सावरण्याची धडपड सुरु होती. तिने परत शिक्षण सुरु करावे या एकमताला कुमुद तयार झाली. परत बाराव्वीची परीक्षा देणार, सोबत तिने टायपिंग सारखे वर्गही सुरु केले. आधीच अबोल अन अलिप्त असणारी कुमुद आता कोमेजून गेली होती. आता ती सगळ्यांशी बोलणे टाळू लागली. आचार्यबाईंच्या मदतीने ती समितीत जाऊ लागली. दुभंगलेल्या संसाराचं ओझं आम्ही कमी करु शकत नव्हतो मात्र त्याची तीव्रता कमी करण्याचा जो तो प्रयत्न करत आहे.

सुमी-सुहास प्रेमकहाणी सुरळीत चालू आहे. सुहासदा नोकरीसाठी एकदोनदा नागपुर-यवतमाळला जाऊन आला. पण नोकरीचे अजून जमत नव्हतं. मागे बाबांनी त्याला बँकेची परिक्षा देण्यासाठी प्रोत्साहन दिलं होतं. त्याची नोकरी करत पुढे शिकण्याची जिद्द होती. एका सहकारी बँकेत सहा महिन्याच्या प्रोबेशनवर त्याची चंद्र्पुर येथे नेमणुक करण्यात आली. खरं तर आनंदाची बातमी होती. पण सुमीच्या डोळ्यातले पाणी थांबतच नव्हते. अगं प्रेमासाठी पोट भरण्याची व्यवस्था नको का करायला? सुहासदाने खूप समजवून सांगितलं. वियोगाच्या कल्पनेनेच सुमी फारच घाबरली होती.

’आपलं पुढे काय?” या काळजीत ती का खंगते मला काय सुहासदाला कळलं नाही.

येत्या दहा तारखेला निकाल आहे. बघू काय होतंय. मेडिकलला प्रवेश मिळेल का?

११/६/१९७६

सुहासदाने त्याचे आणि सुमीच्या प्रेमाबद्दल घरी सांगितले. कोणी आडकाठी घ्यायचा प्रश्नच नव्हता. सुहासदाच्या चंद्रपुरला जायच्या आधी दोघांचा घाईघाईत साखरपुडा आटोपला. आईबाबांच्या मदतीने ही प्रेमकहाणी मार्गाला लागली. लग्न सुमीच्या शिक्षणानंतर करायचं ठरलं. आणाभाका घेत सुहासदा चंद्रपुरला निघाला. सुमी हिरमुसली. जवळ जवळ दहा दिवस ती शकुंतलेसारखी पत्राची वाट पहात होती. पहिलं पत्र मिळालं तेव्हा बाईसाहेबांची कळी खुलली.

माझ्या अपेक्षेप्रमाणे निकाल लागला. मला ६५% मार्क पडलेत. नागपूरला बाबांनी मेडिकलचा फॉर्म भरला होता. यादी लागणार, त्यात आपलं नाव असणार का?

१६/६/१९७६

नागपूर मेडिकल कॉलेजच्या यादीत माझं नाव होतं. आजवर मेडिकलला जायचं ही कल्पना सुखदायक वाटायची. आता लहानपण, मैत्रिणी, माझं घर, आईबाबा या सर्वांना सोडून जावं लागणार ही कल्पना असह्य वाटत होती.

मेडिकलची ॲडमिशन पक्की झाली. नागपूरला जायचं. आता जावंच लागणार. आमची पण सुमी-सुहास सारखी ताटातुट होणार या भितीने माझ्या पोटातही गोळा येत होता. आईबाबा, कुमुद, सुमी आणि प्रसन्ना या सर्वांना सोडून मी तरी राहू शकणार होते का? हा प्रश्न सारखा छळत होता.

नागपूरला रहाण्याची सोय....जेवणाची सोय सगळच बघायचं होतं. बाबांनी चारपाच दिवसांची रजा टाकली. माझी रहाण्याची व्यवस्था होईपर्यन्त आम्ही दोन-तीन दिवस बाबांच्या मित्राकडे रहाणार.

नागपूरला जायच्या आधी एकदा माझी शाळा डोळे भरुन बघून आले. शाळा, नवे दप्तर, नवी पाटी, नवे पुस्तकं, नवी पेन्सील, नवीन वह्यांचा वास, सगळं आठवलं. पटांगणात ते बेभान धावणं, मधल्या सुट्टीतला डबा, मैत्रिणींनी आणलेली बोरं, चिंचा, दात आंबट होई पर्यन्त खाल्लेले ते आवळे, देवळातल्या पारावरचं जांभाळाचं झाड, त्याची जांभळं तर जीभ जड होईपर्यन्त खाल्ली. मुलांना वाकुल्या दाखवणं, निकालाच्या दिवशी आलेला वैताग, ते गॅदरींगचे दिवस, दिवसभर चालणारी नाटकांची आणि नाचाची तालीम, नाचाची रोज जोडी बदलायची. वैतागून बाई नाचाचं गाणं बदलून टाकायच्या. ती बागेत जाणारी सहल, सहलीतली धमाल, बागेतल्या कारंज्यात भिजण्यासाठी मुद्दाम केलेली धक्का-बुक्की. एका मैत्रिणीच्या चुकीचा वाटून घेतलेला मार, सगळयातच आपली भागीदारी. चौथीत पहिल्यांदाच वापरलेले शाईचे पेन,

गणवेषावर पडलेला त्याचा भला मोठा डाग, बाईंचा डोळा चुकवून तिघी चौघींनी डबक्यातल्या पाण्यानं तो काढला, त्यावर ओला खडू फिरवण्याची शक्कल माझीच. कारण आईचा धाक. धाकातच जाणारा रोज गणिताचा तास, भूगोलाच्या वर्गात येणारी पेंग, इतिहासाच्या पुस्तकात सगळ्यांनाच शिवाजी करुन टाकलं, अगदी गांधी, टिळक, फुले, नेहरु कोणालाच नाही सोडलं. चार दिवस वर्गाबाहेर. बाहेरुन वर्ग कसा दिसतो याचं वर्णन मी सगळ्यांची नक्कल करुन दाखवली. अजिंक्य कशी तिरपी मान हालवतो, बाईंची पाठ फिरली की संदीप हळूच खिशातून फुटाणे कसा खातो. रजनी बाईंचा डोळा चुकवून कसा कंगवा करते. अभिजीत सतत खाली मान घालून असतो हा गैरसमज मीच तर दूर केला. तो खाली मान करुन एक डुलकी घेऊनच घ्यायचा. मैदानी स्पर्धेत तर धमाल असायची. शिक्षक वैतागून जायचे. कितीतरी गमती शाळेच्या या परिसरात मी केल्या, अनुभवल्या, आणि हे सगळं सोडून जायचं म्हणजे त्रास होतं होता.

कसे भर्रकन सरले हे शाळेचे दिवस. हे अनुभव आता फक्त आठवणीत जपायचे.

माझं कॉलेज. पहिल्याच दिवशी उशीर झाला होता. घाबरत घाबरत वर्गात गेले. कोणी काहीच म्हटले नाही. मग हळूहळू अंगात धीटाई आली. काही मैत्रिणी शाळेतल्या काही नवीन. इथेही खूप धमाल केली. गृहपाठ केला नसेल तर शेवटच्या बाकावर जाऊन बिनधास्त गृहपाठ करायचा. तास विज्ञानाचा पुस्तक गणिताचे गृहपाठ इंग्रजीचा. गॅदरिंगची मजा जी कॉलेजमधे असते ती कुठेच नसते. वादविवाद स्पर्धेची मी आतूरतेनी वाट बघायची. खेळ, खो-खो, कबड्डी, बास्केटबॉल, स्पर्धा आम्ही खूप गाजवल्या. भरपूर बक्षीस मिळाली, भरपूर मार खाल्ला. आमची सहल, तर कुठे जाते हे कधीच महत्वाचे नव्हते. कोण कोण येणार आहे हे खूप महत्वाचे असायचे. लायब्ररीत पुस्तक कमी वाचली. बेत जास्त आखलेत. आज काय करायचं? कोणी कुठे भेटायचं? कॉलेज झाल्यावर आम्ही गेटजवळ मोठ्ठ वडाचं झाड होतं तिथे नेमाने रोज भेटायचो. नंतर त्याला सेकन्ड ईअर कट्टा असं नावच पडलं. नंतर ईअर निघून

आता अख्खं कॉलेज सेकन्ड कट्टा म्हणूनच ओळखतं. आता या आठवणींना मी माझ्यासोबत घेऊन जाणार. खरंच सांगणं सोप्पं असतं करणं त्याहून कठीण हे मला आज कळलं. मी मेडिकलला जाणार या कल्पनेने खूप आनंदात होते. प्रत्यक्षात जेव्हा सोडून जायची वेळ जवळ आली होती तर माझा पाय निघत नव्हता. मन आणि बुद्धी दोन्हीही जेव्हा अगतिक होतात, या अवस्थेला नक्की काय म्हणतात ठाऊक नाही, पण या अवस्थेत सध्या मी अडकले होते.

२०/०६/१९७६

चार दिवसांपासून माझ्या सामानाची बांधाबांध चालली होती. काल आत्या येऊन गेली. मावशीने यवतमाळवरून पत्र पाठवले होते. नागपूरला जायचा दिवस उजाडला. सगळ्यांचीच मनं जड झाली होती. आईचे हुंदके थांबत नव्हते. सुमी, कुमुद हात सोडत नव्हत्या. दूर उभा राहून प्रसन्ना माझ्याकडे बघत आहे असा मला भास झाला. हा विचार कासावीस करुन गेला. काल संध्याकाळीच आम्ही फोनवर किती वेळ बोललो. दूर जाण्याने प्रेम कधी कमी होत नाही हे मी त्याला खूपदा सांगून झाले. पण तो ऐकेल तर ना, सारखा प्रसन्नाचा उदास चेहरा माझ्या डोळ्यासमोर येत होता.

सुधाआजीने मीठमोहरी ओवाळून टाकली. लिमये काका येऊन गेले. नरुमावशीने माझ्या आवडीचे बेसनाचे लाडू करुन आणले. कुमुदचे हुंदके थांबत नव्हते. सुमीने मला रुमाल दिला. त्यावर गार्गी अक्षराचे भरतकाम बघून मला रडायलाच आले. गौराबाईसुध्दा रडत होती. सगळ्यांनी माझी रडत पाठवणी केली. जसं बसनी वर्धा मागे टाकलं त्या क्षणी मला खूप गहिवरुन आलं, आपण सगळं सोडून दूर चाललो ही भावना खरच भयावह असते. मी आपल्या लोकांना सोडून जाण्याचे दु:ख आणि नवीन वातावरण कसे असेल? नवीन लोकं कशी असतील? या विवंचनेत होती. नव्या ठिकाणी जाण्याची ओढ होती, जुने सुटत असल्याचे दु:ख अशा संमिश्र कोंडीत मी अडकले होते. कानात आईबाबांचे शब्द घुमत होते. इकडची काळजी करु नको. खूप अभ्यास कर डॉक्टर हो आणि लवकर परत ये. नुकतेच पंख फुटलेली चिमणी घरट सोडून आकाशात झेप घेते तशीच माझी अवस्था झाली होती.

२२/६/१९७६

मेडिकल कॉलेजच्या आवारातील होस्टेलमधे रुम बघायला जायचं आहे. बाबा आधीच बघून आले होते. मी ही बघितली. संध्याकाळी मी सर्व सामानासकट होस्टेलला जायच ठरलं. देशमुख काका आणि काकूंनी खूप मदत केली. काही लागले तर कळवं, घरी येत जा इ.इ.निरोपांची देवाण घेवाण झाली. मला होस्टेलला सोडून बाबा वर्धेसाठी रवाना झाले.

पहिल्यांदा मी एका अनोळखी जागी एकटी रहाणार. मला काहीच सुचत नव्हतं. नवी खोली, नवी मैत्रीण- सुनंदा तिच्या सोबत या खोलीत रहायचं. हवं तेवढं सामान बाहेर काढून मी बाकी सामान पेटीतच ठेवले आणि ती पलंगाखाली ढकलून दिली. खोलीचा अंदाज घेत असतांना, कुठे काय आहे हे बघत होती तोच मेट्रनने खाली हॉलमधे बोलवले असा निरोप आला. मी डायरी टेबलच्या ड्रावर मधे टाकत सुनंदासोबत खाली हॉल मधे आले. मला सगळेच नवीन होते. माझ्यासारख्या नव्या मुली दिसल्या. आमच्या सिनीअरने आम्हाला एकमेकांशी बोलू दिले नाही. मेट्रनने नव्या मुलींना होस्टेलचे नियम सांगितले. वेळ पाळण्याचे आवाहन करत मिटींग बरखास्त झाली. बाप रे! काय जेवण होते. लगेच लक्षात आलं, जेवणाला नावं ठेवायचं नाही. कोबी-बटाटा भाजी, आमटी, पोळ्या, पराठे, चपाती यात मोडणारा एक प्रकार, लोणचं नाही लोणच्याचा खार होता. जेवतांना मी फारशी कुणाशी बोलले नाही. सरळ आपल्या खोलीत आले. रात्री बरोबर नऊ वाजता मेट्रन लाईट बंद करते. पंखा गोल फिरतांना दिसला. मी झोपायचा प्रयत्न करु लागली.

२३/६/१९७६

काल रात्रभर कड बदलत होते. डोळा लागलाच नाही. विचारांचं थैमान डोक्यात मावेनास झालं आहे. सारखा प्रसन्नाचा चेहरा डोळ्यासमोर येत आहे. नवीन वातावरणात रुळणं फारच कठीण आहे. राहून राहून घरची आठवण येत आहे. आयुष्यात एक पोकळी निर्माण झाल्यासारखी वाटत आहे. बाबा म्हणतात आयुष्याचा आपण जेव्हा नव्याने प्रवास सुरु करतो तेव्हा खूपशा आवडत्या नावडत्या गोष्टी जुन्या वळणावर सोडून द्याव्या लागतात. त्याच्यासकट प्रवास खूप त्रासदायक ठरु शकतो. कदाचित मला याचाच तर त्रास होत नाही ना? पण काय काय सोडायचं जुन्या वळणावर? गुंता नुसता विचारांचा गुंता. मेडिकल पूर्ण करायचं तर हा गुंता सोडवायलाच हवा. मला इथे रुळायलाच हवे. मीच माझी समजूत काढली.

२४/६/१९७६

वेगवेगळ्या स्वभावाच्या लोकांशी जुळवून घेत काम करणं हा माझ्या आयुष्यातील पहिलावहिला प्रसंग. ते सगळे असे एकदमच भेटतील असं कधीच वाटलं नाही. इथला स्टाफ बहुभाषिक. प्रत्येकाचा निराळा ढंग, वेगळी चाल. सकाळपासून रात्री पर्यन्त विविध विचारांची लोक भेटलीत. त्यांना आपल्या पद्धतीने डील करणं म्हणजे महाकठीण काम. आजवर मी जे मला पटलं तेच केलं. आता असं नाही, मला पटेल असं करायला भरपूर गोष्टींचा विचार करावा लागतो. असो प्रसन्नाची आठवण आली की काहीच सुचत नाही. खूप दिवसांनी आज कविता आठवली, ठरवून रोज दोन ओळी लिहायला जमलं नाही. "पांखरा ! येशिल का परतून" ना.वा.टिळक यांच्या कवितेतील प्रसन्नासाठी आजच्या ओळी :

पांखरा येशिल का परतून
मत्प्रेमाने दिल्या खुणांतून
एक तरी आठवून ? पांखरा !
हवेसवें मिसळल्या माझिया
निश्वासा वळखून ? पांखरा !
वार्यावरचा तरंग चंचल
जाशिल तू भडकून ! पांखरा !
थांब घेउ दे रुप तुझें हें
हृदयी पूर्ण भरुन ! पांखरा !

२८/६/१९७६

सध्या अभ्यास सुरु झालेलाच नाही. मेडिकल कॉलेज आणि हॉस्पिटलला एक राउंड झाला. सर्वत्र स्पिरिट आणि फिनाइल चा संमिश्र कोंदट वास येत होता. कोणी पांढरे कोणी पिंगट पांढरे ॲपरन घालून घोळक्यात उभे होते. मग कळले ती नोटिस-बोर्ड समोरील गर्दी होती. मी वेळापत्रक लिहून घेतले आणि त्या घोळक्यात नकळत सामील झाले. तिथेच चार-पाच जणांशी तोंड ओळख झाली. त्या लोकांशी ओळख होई पर्यन्त मी नागपूर शहरात देशमुख काका-काकू, सुनंदा, मेट्रन या व्यतिरिक्त कोणालाच ओळखत नव्हते.

होस्टेल आणि कॉलेज मधलं अंतर फार नाही. एक पायवाट आहे. भोवती बोरी, बाभळीची गर्द झाडी आहे. होस्टेलची रुम ठीकठाक आहे. पहिल्या मजल्यावर सहा नंबरची रुम. त्यात दोन आवाज करणारे पलंग, दोन  टेबलं, एक लाकडी कपाट त्यात दोन बाजू, एक सुनंदाची एक माझी. एक मोठी खिडकी ज्याचे गज गंजलेत आणि त्यावर दिमाखात लोंबणारा निळा जाडाभराडा पडदा. जवळच कॉमन टॉयलेट - बाथरुम आहेत. सकाळी आठ वाजेपर्यन्त गरम पाणी येतं. मेस तर एकदम खास आहे. मोठ्ठे ब्रिटिश कालीन लाकडी लांबच लांब दोन टेबलं त्यालाच मॅचिंग नवीन तीन चार आठ सीटर टेबलं, अवती भवती काही स्टुल, काही खुर्च्या. मेसमधे काम करणारे चार मेंचट अन तेलकट आचारी, एक शिपाई कम हरकाम्या आणि एक मेट्रन. दिसायला जरी रोड असली तरी आवाज भारदस्त. अशा वातावरणात मला किमान चार-पाच वर्ष काढायची आहेत, या विचारांनीच अख्ख्या देहात मुंग्या फिरल्यासारखं वाटलं. भारलेल्या अवस्थेत मी कपाटात सगळं सामान ठेवलं. नवी चादर, उशीचे अभ्रे आणि पांघरुण काढलं. कपडे वाळत घालायला जागा नव्हती. सगळ्यांनी आपल्या खोलीतच व्यवस्था केली होती. सामान बांधले तीच सुतळी मी खोलीत माझ्या पलंगाजवळ बांधली, सुनंदाने

बांधली तशी. खिडकी मला खूप आवडली. ती खूप मोठी होती. त्याच्या कठडयावर बसता येत होतं. खिडकितून मावळतीचा सूर्य दिसला की प्रसन्नाची आठवण रोजच येते.

३०/६/१९७६

आज आईला सविस्तर पत्र टाकलय. त्यावरुन सुमीचे पत्र वाचायचं राहून गेल्याचं लक्षात आलं. येऊन दहा दिवस झाले नाही तर बाईसाहेबांनी पत्रही पाठवलं. मी उत्सुकतेनी पत्र वाचायला घेतले. कुमुदची कॉलेजमधे ॲडमिशन झाली. सुहासदा शनिवारी येऊन गेला. सुधा आजीची तब्येत मध्यंतरी ठिक नव्हती, आता ठीक आहे. आई बाबा ठीक. नेहमीचाच पत्रातला मजकुर. माझा नागपूरला यायचा निर्णय योग्य ना? का ठाउक नाही पण माझ्या या निर्णायावर प्रसन्ना फारसा खुश वाटला नाही. परत माझ्या मनाचे खेळ सुरु झाले. आठवणींच्या गर्द धुक्यातच कधीतरी डोळा लागायचा.

कॉलेजमधे लेक्चर्स सुरु झाले. सिनिअर्स थोडा थोडा त्रास देत आहेत. त्यांची छोटी छोटी कामं करावी लागतात. प्रॅक्टिकल्स सुरु झालेत. डिसेक्शन सेशनला सारेच घाबरत होते. मलाही दडपण होतच....

७/७/१९७६

बरेच दिवस झालेत डायरी लिहू लिहू म्हणता, वेळ मिळत नाही असे नाही. काय लिहू सुचत नाही. असो. हॉस्पिटल मधल्या वासाची सवय झाली. आधी जेवण कसं तरी वाटायच, आता काही वाटत नाही. सेम तसच डिसेक्शन सेशनला झालं. प्राण्यांचे डिसेक्शन केल्यावर मी कित्तीदा हात धुवून जेवायला बसायची. हल्ली ॲनॅटॉमी डिपार्ट्मेन्टला एकटी जायला भितीही वाटत नाही आणि फॉर्म्यालिनचा वासही जीवघेणा वाटत नाही. सवय हे तीन अक्षरं आपल्या जगात कशी हक्कानं येतात, नकळत आपल्याभोवती वेढा टाकतात आणि आपल्यातच घुटमळतात आपण कितीही नको म्हंटले तरीही. माझ्याही भोवती हे तीन अक्षरं घुटमळायला लागलीत. थोडक्यात मी या वातावरणात रुळू लागले आहे. ग्रुप डिस्कशनला वेगळीच मजा येते. आज तर नुसते इंट्रोडक्शन झाले. बापरे! कुठून कुठून मुलं आली आहेत. खूपजणांशी ओळख झाली. कॉलेजमधे एकटं फिरायला भिती वाटते. कॉलेज ते होस्टेल मार्गावर पुष्कळ मुली भेटतात. हळूहळू ओळख होते आहे.

आज आईचे पत्र वाचून डोळ्यात पाणी आलं. सुनंदानी हेरलं. ती जवळ येऊन बसली. आल्यापासून पहिल्यांदाच आम्ही खूप गप्पा मारल्या. ती कोकणातली. घरी आंब्याची आणि फणसाची बाग आहे. काजूचा व्यवसाय आहे. ती मला नेहमी काजू खायला देते. तिला बघितलं की सुमीची आठवण येते. ती मला दोन वर्ष सिनीअर, तिच्यामुळेच मला इतर सिनिअर कडून त्रास कमी होतो आणि मुख्य म्हणजे माझ्या नोट्सचा प्रॉब्लेम सुटला.

सुमीने आर्टसला ॲडमिशन घेतली. आधी ती बी.ए.स्सी करणार होती मग हा बदल मला आईच्या पत्रातून कळला.

प्रसन्ना येत्या शनिवारी येणार आहे. त्याला भेटण्यासाठी मी किती आतूर आहे माझं मलाच माहिती. प्रसन्ना मला कधी एकदा भेटतो असं वाटत आहे.

१०/७/१९७६

आजचा दिवस मी कधीच विसरु शकत नाही. आज ॲनॅटॉमीमधे पहिल्यांदाच माणसाचा देह कापाकापीसाठी दिला. समोर पुस्तक ठेऊन आकृतीत बघून स्नायु, रक्तवाहिन्या शोधत होतो. पहिल्यांदा मला मळमळलंच. जीवच होत नव्हता, हात धजत नव्हता, मेंदुला पार मुंग्या आल्या होत्या. डोळे मिटून कुठल्या देवाचं स्मरण करु या विचारात होते. ग्रुप लीडर निर्विकार होता. भाजी निवडावी तसे एक एक अवयव शोधून माहिती देत होता. त्याला अर्थाचत या सर्वांची सवय होती. नवीन बॅचला प्रत्येक ग्रुपला एक सिनिअर ग्रुप लीडर नेमून दिला होता. तो ही फक्त पंधरा दिवसांसाठीच नंतर आम्हाला आमचे शोध लावायचे. आज तर घशात अन्नही जाईना. यापूढे कुठलीच कविता काय काहीच आठवत नाही. एक मुलगी तर चक्कर येऊनच पडली. परत येतांना चौफेर नजर फिरवली तेव्हा सगळी कडे प्रेतंच प्रेतं सॉरी बॉडीज़ होत्या, कुणी तरुण, कुणी म्हातारं, कुठून आले असतील हे सगळे, त्यांच्या उरल्या-सुरल्या निष्प्राण अस्तित्वावर आम्ही मेडिकलचे स्टुडन्ट्स घाला घालत होतो, ते केवळ "व्हॉट इज़ इनसाईड ह्यूमन बॉडी?" या प्रश्नाचे उत्तर शोधण्यासाठी. काही जणांना ही कापाकापी खूप आवडते. काही नवीन सापडलं तर धावत धावत येऊन सगळ्यांना सांगतात.

१५/७/१९७६

प्रसन्नाला भेटून खूप छान वाटलं. त्याने मला एक घड्याळ भेट दिलं. त्याने दिलेली ही पहिली भेटवस्तु. त्याला माहित आहे प्रियकराकडून भेटवस्तु घेणं, हॉटेलमधे जाणं मला फारसं पटत नाही. माझा रिझल्ट, मेडिकलची ॲडमिशन सगळं मिळून दिलेली ती भेट मला खूपच आवडली. मी किती वेडी त्याच्यासाठी काहीच आणले नाही. तेव्हा त्याने उद्या येतांना "तुझी माझी भेट व्हावी" ही कविता लिहून मला भेट दे असं म्हंटल्यावर मला केवढा आनंद झाला शब्दात सांगू शकत नाही. खरंच मला कळतच नाही. मी एखादं पेन त्याच्यासाठी नक्कीच घेऊ शकली असती. अश्यावेळेस माझं डोकं चालतच नाही. आज सुमीची आठवण आली, ती असती तर हे घेऊन ठेव, ते घेऊन ठेव केलं असतं. सुहासदाला तर ती कायम काहीना काही भेटवस्तु देत असते.

येतांना प्रसन्नासोबत बाबांनी पैसे पाठवले. आईने खूप सारा खाऊ पाठवला. तो तर या चिमण्यांच्या तावडीत दोन दिवसात पार होणार.

खूप वेळ आम्ही निशब्द होतो. खूपशा आणाभाका, शपथा यावर दोघांचाही विश्वास नव्हता. साक्षीला आमची आमच्यासाठी धडधडणारी हृदयच पुरेशी आहेत. खरंच इतकं समजुतदार आणि शब्दांच्यापलीकडचं आमच प्रेमं कुणाला कळावं असेही कधी वाटलं नाही. ते फक्त आमचं आणि आमच्यासाठी होतं.

२८/०७/१९७६

माझा पत्रव्यवहार घरी, सुमी, कुमुद-प्रसन्ना यांना नियमित सुरु आहे. मी आता मेडिकल कॉलेजमधे चांगलीच रुळली आहे. माझी भिती तर कुठल्या कुठे पळाली. आता ॲनॅटॉमीमधे मी एकटीपण जाऊ शकते. थँक गॉड तशी वेळ अजून आली नाही. मला लायब्ररीत जाउन अभ्यास करायला आवडतं. मी तास न तास तिथे बसते आणि नोट्स काढते. माझ्यासारखीच एक कला नावाची मुलगी पण तिथे येऊन तास न तास बसली असायची. माझी अन तिची छान मैत्री झाली. मात्र रोज रात्री डायरी काढली की मला घरची आठवण येते. त्या गप्पा, समिती, आईबाबा सगळं मी खूप मिस करते. एकेक क्षण मागे सोडत पुढे जाणं भाग आहे. आज मला बाबांनी सांगितलेल्या वाक्याचा खरा अर्थ कळला. नव्या प्रवासात जुने काही आवडते-नावडते सोडून द्यावं लागतं नाही तर प्रवास क्लेषदायक होतो. जशी जशी मी या नवीन वातावरणात रुळत होते मला वाटत होतं कि माझे जुने क्षण माझ्या मुठीतून सुटत आहेत. आता आहेत काही आठवणी त्यातील खूपशा क्षीण झाल्यात.

सुमीने आमचा कॉलेजमधला ग्रुप फोटो पाठवला होता. ती आठवण मी याच डायरीत शेवटच्या पानावर चिटकवून ठेवली आहे, काही आठवणी आपणच जपायच्या म्हणून. प्रसन्नाचे पत्र आले. ते तर मी रोज वाचते. माझ्या एका किस्स्यावर चार ओळी हा हा हा हा लिहून पाठवले. जर तिथे असतो तर तेवढाच हसलो असतो. मन्या तुझे मेडिकलचे किस्से लिहून पाठवत जा. जरा "हा म्हणे, तो म्हणे" नाही लिहिलंस तरी कळेल मला. मला माझंच हसू आलं, खरच त्याला पत्र लिहितांना सुचतच नव्हतं. एक तर पहिल्यांदाच लिहित होते आणि दुसरे म्हणजे मी नावांसकट त्यात प्रत्येकवेळेस "म्हणे" जोडून लिहिलं होतं. प्रत्यक्षात बोलणं वेगळं आणि लिहिणं वेगळं, तेव्हा मला कळलं मी तावातावात खूप बोलू शकते पण लिहू शकत नाही. हा माझ्याबद्दल मला शोध खूप दिवसांनी लागला. होतं मला असं अधूनमधून. मलाच मी उमगते कधी कधी.

१४/०८/१९७६

आज माझा वाढदिवस. मला भेटायला आईबाबा दोघेही आले होते. अख्खा दिवस मी बाहेरच होते. आईने काय काय आणलं, नवे ड्रेस... खायचे पदार्थ... मला भेटून आई आनंदात होती. तिची तब्येत बरी वाटली नाही. थोडी रोडावली होती. इतक्या दिवसांनी भेटल्यावर काय बोलायचं सुचतच नव्हतं. माझा मागचा वाढदिवस किती छान साजरा केला होता. यावेळेस ज्या लोकांना माहिती होत गेलं त्यांनी विश केलं. कोरड्या मनाने...

का कोण जाणे इतक्या दिवसात माझी कोणाशी खास एकदम खास मैत्री जुळलीच नाही. बहुधा मीच टाळते, मला उगीच वाटून गेले. जाता जाता आईची सुचनांची यादी वाचणं सुरु झालं आणि जड अंत:करणांनी दोघे वर्धेला रवाना झालेत. आईबाबांना सोडून आले तेव्हा पोर्चमधे कला भेटली. चेहरा केवढा रडवेला झाला होता तिचा. ती धावतच तिच्या खोलीकडे जातांना मी बघितलं. तिची खोली लांब होती. जाऊन तर बघायलाच हवे. रस्त्यात तिची रुममेट सावित्री दिसली. दोघींनी तिला खूप विचारायचा प्रयत्न केला पण पठ्ठी काहीच बोलली नाही. शेवटी मी माझ्या रुममधे निघून आले. उद्या बोलू तिच्याशी असे मनोमन ठरवले. प्रसन्नाचे वाढदिवसाचे शुभेच्छा कार्ड आले त्याच्यावर हात फिरवतांना मला क्षणभर त्याचाच भास झाला. किती छळतात हे आभास. मी ते कार्ड उशीखाली ठेऊन झोपते.

१८/०९/१९७६

बाबा भेटायला येऊन गेले आणि डायरीची आठवण झाली. बाबांनी काही फोटो आणलेत, मी ते या डायरीत चिटकवून ठेवले. मी खाली नाव, तारीख लिहिणार होते. मग वाटलं, माझीच डायरी माझ्यासाठीच आहे, म्हणून कुठलाच तपशील न लिहिता तसेच ठेवले. त्यात एक प्रसन्नाचा फोटो आहे. सुनंदाने मला डायरीबद्दल विचारायचा खूप प्रयत्न केला. माझ्या आधीच्या आयुष्याची खूप विचारपूस केली. पण मला काहीच सांगावसं वाटलं नाही, कदाचित ती इतकी क्लोज आली नसावी. कारण मलाही माहित नाही. सांगावस वाटलं नाही. खरच, सगळ्या गोष्टी सगळ्यांशीच तुम्ही शेअर नाही करु शकत. मुख्य म्हणजे मलाही आवडत असं अव्यक्त रहायला.

२४/१०/१९७६

मेडिकलला आल्यावर सणवार सगळं विसरावं लागतं. मला तर एकादशी, नवरात्र आले-गेले कळलेच नाही. विजयादशमीची तेवढी सुट्टी होती. तरी गंधे सरांनी वर्ग घेतलाच. चतुर्थी तेवढी लक्षात रहायची कारण त्यादिवशी मेस मधे साबुदाणा खिचडी आणि वडा मिळायचा. आता मेस मधलं जेवण आवडायला लागलं. आम्ही तर घरचं जेवलो तर नक्की अपचन होईल असं मिस्कीलपणे म्हणायचो. मेट्रनला सगळे गिलहरी म्हणायचे. मीही म्हणायला लागले. का तर ती खारीसारखी झपाझप आणि तिरकी चालायची. एक लठ्ठ आचारी होता, त्याला गेंदाफुल म्हणायचो तर शिपायाला सगळे सलाम म्हणायचो. तो ज्याला त्याला सलाम करत फिरायचा.

आज कलाबद्दल खूप चौकशी केली. ती सुट्टी घेउन घरी गेली ती अजून आली नव्हती. ती का गेली कोणाला काहीच माहित नव्हते. सावित्रीला काहीच माहित नव्हते.

आज ओपीडीत फ्रॅक्चरच प्लास्टर कसं बांधायचं ते शिकवलं. सुरवातीला मला जमेना. सिस्टर नंदा यात एक्स्पर्ट. तिने सांगितले आणि मला जमले. हळूहळू इथल्या स्टाफशी मैत्री झाली. काही स्वभावानं खूप चांगले, आम्हाला मदत करणारे, कोणी आमची मजा पहाणारे. रोज नवीन अनुभवाचा डोज़ मिळायचाच.

३१/१०/१९७६

दिवाळीच्या चार दिवस सुट्ट्या मिळाल्या मी वर्धेला आजच निघणार होते. बाबांना मीच घ्यायला येऊ नका म्हटलं. पोहचायला रात्र झाली असती म्हणून मी उद्या सकाळी निघायच ठरवलं..बरीच जण गावी जाणार होती काही निघून गेली होती. प्रसन्ना परवाच वर्धेला पोहचला होता. माझ्यासाठी सरप्राईज आहे असे पत्रात लिहून पाठवले होते. मला त्याला केव्हा भेटीन असे झाले होते. उद्या मी माझ्या घरी असणार हा आनंद माझ्यातच मावत नव्हता. सामान विशेष न्यायचे नव्हते, असं म्हणता म्हणता बरच सामान घेतलं. चादरी धुवायच्या होत्या, ड्रेसेस धुवायचे होते. एक क्षण वाटलं हा पडदा घेऊन जावा आणि गौराबाईकडून स्वच्छ करुन आणावा.

३/११/१९७६

वर्धेला आली काय, झालं, जायची वेळ पण जवळ आली. दिवाळी छान झाली. कुमुद, सुमी किती बदलल्यात. कुमुद तर काहीच बोलली नाही. काका-काकूंच्या आग्रहास्तव दुसऱ्या लग्नाबद्दल मी तिच्याशी बोलून पाहिलं. पण पहिली जखम तिने ओलीच ठेवल्याचे मला आणि सुमीला लक्षात आले. ते सुख तिच्या नशीबी नाही हेच धरुन बसली आहे. तिला समुपदेशकाची गरज आहे हेही मला लक्षात आले. माझ्या जवळ इतका वेळ नव्हता. सुमी-सुहासदाचे लग्नाची तारीख निघाली. एप्रिल महिन्यात. तिचे शिक्षण ती आता चंद्रपूरला जाउन पूर्ण करणार म्हणे. मला खूप आनंद झाला.

प्रसन्नाने विचारले “आपले काय?” मी निरुत्तर झाले. खरंच आमचं काय? मी या बद्दल कधी विचारच केला नाही. मी अजून एम बी बी एस ची पहिली परीक्षा दिली नाही. "गम्मत केली" असे जरी प्रसन्नाने म्हंटलं असलं तरी एक काळजी त्याच्या डोळ्यात तरंगून गेल्याचं मी बघितलं.

माझं सरप्राईज कुठे? मी उत्सुकतेने विचारले. तोच त्याने माझ्या हातावर एक बॅग ठेवली. त्यात खूप सुंदर साडी होती. कोसा, खूप महाग असेल ना? मी बावळटपणा केलाच. अरे मी कुठे नेसते साडी? मग नेस. मला जाम आवडली, वाटलं तू यात खूप सुंदर दिसशील म्हणून घेतली. अर्धे पैसे आईनी दिले. ग्रेट ते पण सांगितलं. मी साडी घेतोय असं नाही सांगितलं. एका गिफ्टसाठी थोडे पैसे कमी पडतात म्हटल्यावर तिनेच दिले. माझ्यासाठी हे पण सरप्राईज़च होतं.

१८/११/१९७६

आज खूप दिवसांनी डायरी लिहायला वेळ मिळाला. कॉलेजमधे आल्यावर कलाबद्दल जे कळले ते माझ्या मनाला पटणारं नव्हतं. मला अजूनही तिने आत्महत्या केली यावर विश्वास बसत नाही आहे. ती अतिशय हुशार होती. आम्ही लायब्ररीत किती गप्पा मारायचो. खूप चर्चा झाली या विषयावर. खरं कारण काय आहे ते कोणालाच ठाउक नव्हतं. तिची रुममेट सावित्रीकडून सुनंदाला बरीच माहिती मिळली. खरं तर मला असल्या प्रकरणात रस नाही. आत्महत्या म्हणजे माझाच जीव थरथरला. असं काही आयुष्यात घडावं की आपलाच जीव आपल्याला जड व्हावा. जीव घेतांना किती यातना झाल्या असतील तिला. हा विचार येताच अंगभर शहारे आलेत.

थोडक्यात प्रेमप्रकारण, प्रेमाने जीव घेतला. कन्डोलन्स मधे फारशी कुणाशी न बोलणारी कला, तिच्याबद्दल अजून बरीच माहिती कळली. एका अबोल-समंजस-अवेळी जीव गमावलेल्या देहाला मी श्रध्दांजली वाहिली...

१५/१२/१९७६

भरपूर आभ्यासामुळे आजकाल डायरी लिहिणे जमतच नाही. "वेळ मिळेल तसं लिहिणार" निदान हा नेम तरी मी चुकवणार नाही. तसंही मनातलं बोलून सांगण्यापेक्षा लिहिणं मी जास्त पसंत करते. त्याने मनावरचं ओझं जरा तरी कमी झाल्यासारखं वाटतं. इथे मेडिकलला आल्यापासून एक गोष्ट माझ्या लक्षात आली ती म्हणजे, मी एवढी मनमिळाऊ, धीट असुनही मी इथल्या वास्तुत रुळली, वातावरणातही रुळली, पण कळत नकळत माणसांत रुळलीच नाही. किंवा मी नवीन लोकांमधे गुंतण्याचा फारसा प्रयत्नच केला नाही. माझं मलाच कळत नव्हतं. प्रसन्नाची बरीच पत्र आहेत रोज झोपायच्या आधी न विसरता वाचते. बहुतेक आईबाबांना आमच्या दोघांबद्दल कळले असा माझा अंदाज आहे. कारण गेल्या आठवड्यात बाबा भेटायला आले आणि त्यांनी मला विविध प्रकारे विचारायचा प्रयत्न केलेला मला आठवतो आहे. कधी कधी या गोष्टींचा विचार केल्यावर मन सुन्न होउन जातं. सुमी-सुहास सारखी आमची प्रेमकथा यशस्वी होणार ना? उगाच मनात कसले कसले विचार यायचे. भविष्याचे स्वप्न दोघांनी मिळून बघितले, ते दोघांनीच पूर्ण करायचे. प्रसन्नाचे हे वाक्य आठवले की मनात गोळा झालेले सारे मळभ अलगद दूर होऊन जातात.

२८/१२/१९७६

कल्चरल ॲक्टिवीटीसाठी सहा जणांसोबत माझी पण नेमणुक झाली आहे. २७मार्चला आमच्या इमारतीला एकवीस वर्ष पूर्ण होतील म्हणून एक सांस्कृतिक कार्यक्रम आयोजित केला आहे. आता आभ्यासासोबत ही जवाबदारी  पेलावी लागणार. आज ग्रुप डिस्कशन मधे रणजीत केवढा चिडला होता. कुमार आणि त्याची बाचाबाची नेहमीचीच. पण कलाचा विषय निघाला आणि सगळ्यांचा मूडच बदलला. बहुतेक या सर्वांना तिच्याबद्दल माहिती होती. मी दुर्लक्ष करायचा प्रयत्न केला. कुठून माझ्यातली उत्कंठा ओठावर आली आणि उत्सुकतेने मी तिच्या आत्महत्येच कारण विचारलं. मी ऐकून सगळे एक क्षण स्तब्धच झाले. एवढा मोठा झंझावात तिच्या आयुष्यात आला आणि सोबत तिलाच घेऊन गेला. आधी तिची कींव आली, नंतर मात्र खूप राग आला. मोलाचे जीवन तिने सहज संपवले तेही त्या संपावण्यासाठी बाध्य करणारा नराधम त्याला कुठलीच शिक्षा न करता. या प्रकरणात शशिकांत दवेसरांचे नाव पुढे आले आणि कलाच्या आईवडिलांनी तक्रार करता आजच त्यांना मेडिकल कॉलेजमधून निलंबित केले होते. पण एवढीच शिक्षा पुरेशी आहे? यावरुन रणजीत आणि कुमारच वाजलं. कोणाततरी अन्यायाविरुध्द मनात त्वेष धगधगत आहे हा विचार माझ्या मनात आला आणि बरं वाटलं. दवे सरांचे हात बरेच लांब होते. फारशी चर्चा न होता हे प्रकरण लवकरच आटोपण्यात आले. हे आटोपशीर घेणाऱ्यांची मला खूप चीड आली. आपल्याच भोवताली कसल्या प्रकारचे लोकं रहातात आणि आपण किती अनभिज्ञ असतो. या प्रकरणापासून मी मात्र सर्वांमधे मिसळू लागले. इतरांबद्दल माहिती घेऊ लागले. माझ्यातला हा बदल मलाच आवडला.

१०/१/१९७७

दिवस भराभर पुढे सरकत होते. कुमुदचे पत्र वाचून छान वाटले. आता तिची गाडी बरीच रुळावर आलेली दिसतेय. कॉलेज करता करता ती वर्धेच्या एका आश्रम शाळेत लहान मुलांना शिकवायला जाते, हे वाचून ती कुठेतरी गुंतते आहे याच समाधान वाटलं. आचार्यबाईंचं तर तिच्या शिवाय पानही हालत नाही. ती पुढच्या आठवड्यात नागपूरला समितीच्या कामासाठी येणार आहे. भगिनी सभागृह, धंतोलीला आहे. एखादे प्रॅक्टिकल चुकवून भेटून येईन.

कॅलेंडरवर नवीन वर्षाचं पान केव्हा बदलले, यंदाही मला कळलंच नाही. आईला बरं नसल्याचा निरोप मिळाला तेव्हापासून कशातच लक्ष लागत नव्हतं. उद्या सकाळी वर्धेला जाऊन बघते. मी नागपूरला आल्यापासून आई एकटी पडली असेल. केव्हा एकदा घरी जाते आणि आईला भेटते असे झाले आहे.

१७/१/१९७७

आईला भेटून बरं वाटलं. बाबांचा नोकरी सोडण्याचा निर्णय मला फारसा पटला नाही. परवा बाबा नागपूरला मुलाखतीसाठी येणार आहेत. बघू काय होते ते. लिमये काकांचे भाऊ एका कॉमर्स कॉलेज मधे लेक्चरर आहेत. त्यांनीच बोलावले होते. आईचे काय, नागपूर म्हटलं तर लगेचच तयार होईल. बरेच दिवसांनी आम्ही एकत्र जेवण केले. आईने माझ्यासाठी माझ्या आवडीची गूळपोळी केली, रात्री अंगणात पत्ते खेळलो. गप्पा झाल्या. सकाळी मी निघाले तर आईच्या डोळ्याला आसवांची धार लागलेली.

२२/१/१९७७

आज मी आणि बाबा कॉफी हाउस मधे भेटलो. बाबा जरा गंभीर वाटले. त्यांचं नोकरी सोडण्याचं जवळ जवळ निश्चित झालं आहे. जी.एस. कॉमर्स कॉलेज मधे लेक्चररचा जॉब आहे. पगारपण चांगला आहे. आम्ही नागपूरला येऊ. तुझे शिक्षण व्यवस्थित होईल. काय मग हो म्हणू? आई तर एका पायावर तयार आहे. हो म्हणतो. तीन महिन्याचा नोटीस पिरेड. नवीन सेशनला जॉइन होतो. किती सहजपणे या कॉफी शॉपमधे आमच्या भविष्याचा, आमचे आयुष्य बदलवणारा एक मोठा निर्णय झाला. बाबांच्या चेहऱ्यावरचा आनंद बघून मला ही आनंद झाला. वर्धेचं घर भाड्याने द्यायचे ठरले. हे आता जरी सोपे वाटत असले तरी वर्धा सोडतांना त्यांना किती त्रास होणार याची मला कल्पना आहे.

माझ्या आयुष्यातला हा पहिला निर्णय प्रसन्नाला न सांगता सवरता घेतल्याचं मला वाटलं.

२२/२/१९७७

संक्रात आली आणि गेली. कुमुद्‌ची भेट आज का आठवली माहित नाही. आधी सतत हसणारा चेहरा आता गंभीर झाला होता. आयुष्याकडून आता तिला कुठलीच अपेक्षा नव्हती. एक प्रसंग माणसाला केवढा बदलून टाकतो. कुमुद कलासारखी भित्री निघाली नाही याचे मनात कुठेतरी समाधान होते. आजही थरथरणारी कुमुद आठवते तिने जे सांगितले ते आज आठवले तरी अंगावर काटा उठतो. तिने नरक यातना भोगल्या होत्या. आपल्या विलासासाठी माणूस कुठल्याही थराला जाऊ शकतो याचे प्रचिती कुमुदच्या आयुष्यात डोकावल्यावर आली. केवळ वंशाला वारस मिळावा म्हणून ते लग्न होते. नवऱ्याची लफडी ती बघत होती, ऐकत होती, आणि तिच्या विरोधाची शिक्षा तिला बेदम मार आणि मानहानीच्या रुपात मिळाली.

एकीने विरोधच केला नाही. जगातूनच हद्दपार झाली. एकीने केला तर तिला त्याची शिक्षा भयंकर भोगावी लगली. आमची आधीची कुमुद हरवून गेली.

२५/२/१९७७

प्रसन्नाच्या पत्रात आमचे नागपूरला येणे त्याला कितपत रुचले-पटले काहीच कल्पना येते नव्हती. आईबाबांच्या येण्याने सुधाआजी एकटी पडणार होती. प्रसन्नाला या बद्दल काहीच विचारले नाही किंवा सांगितले नाही का कोण जाणे मला रुखरुख वाटत आहे. खरं तर हा बाबांचा निर्णय होता. तरी प्रसन्नाला काय वाटेल याचाच विचार करत होती. आई मात्र नागपूरला जायचे ठरल्यापासून खूप आनंदात आहे. प्रसन्नाची प्रतिक्रिया कळावी म्हणून पत्राची वाट बघत आहे. या खेपेस पत्राला खूपच उशीर झाला.

उगाच "थकले रे डोळे माझे वाट तुझी पाहता" गाणे आठवून गेले. माझ्या लक्षात आले आपण इतक्यात कविता, मराठी गाणे गुणगुणणे विसरलो. कित्येक दिवसात कविता वाचली नव्हती. माझे मलाच नवल वाटले. मी मेडिकलच्या अभ्यासात इतके गुंतले की माझ्या आवडी निवडी जपण्याचेच विसरली. असो आता लक्षात आले तर निदान कवितेच्या दोन ओळी तरी लिहू. खूप वेळापासून कुठलीच कविता आठवत नाही.

माझ्यातलं मी पण
उलगडत नाही कधी कधी
दुखात होणारे सुखाचे भास
उमगत नाही कधी कधी
फसव्या क्षणातली हुरहुर
आवरत नाही कधी कधी
अधीर भावनांना टिपण्याचा

धीर होत नाही कधी कधी
अव्यक्त संवेदना शब्दात पकडणं
जमत नाही कधी कधी
सगळ्यांच्याच आयुष्यात
होत का असं कधी कधी?

१०/३/१९७७

प्रसन्नाचे पत्र फारच उशीरा मिळाले. बाबा नागपूरला स्थायिक होणार याचा त्याने आनंदच व्यक्त केला होता. सुधाआजी म्हणजे आम्ही नकळत आणि सहज स्विकारलेली जवाबदारी. आम्हा सर्वांचेच नागपूरला येणे म्हणजे सुधाआजी एकटी पडणार नेमकी हीच जाणीव मला टोचत आहे हे माझ्या लक्षात आले. माझा माझ्याशी प्रामाणिक संवाद मला खूप प्रश्नांना सोडवण्यात मदत करत असतो.

बाबा कालच नागपूरला आले. आज घराचे नक्की करणार होते. नेमका आज माझा बॉडी डिसेक्शनच्या सेकन्ड टर्मचा पहिलाच दिवस होता. मी तुम्हाला आवडले तर फायनल करा सांगून मोकळे झाले. जाता जाता बाबा गॅसचा नंबर लावून गेलेत. बापरे बाबा शिफ्टींगसाठी किती एक्साईट आहेत. मला तर माझ्या अभ्यासातून वेळच होत नव्हता. त्यात कार्यक्रम जवळ येत होता. आमचे नाटक, ते वेळेवर फसले नाही म्हणजे मिळवली.

२९/३/१९७७

कार्यक्रम छान झाला. मलाच हायसं वाटलं. टाळ्या पडल्यात.

सुमी-सुहासच्या लग्नाची तारीख जवळ आली. आईने नेहमीप्रमाणे माझे कपडे वैगरे सगळीच तयारी करुन ठेवली असेलच. मला या गोष्टींमधे कधीच रस नव्हता. आणि आई आवडीनं हे सगळं करुन ठेवायची. तिने सांगितलेले मी निमूटपणे घालायची. सुमीने किती वेळा खरेदी बघायला बोलावले होते, जमलंच नाही. झालं पंधरा वीस दिवसात होस्टेलही सोडावे लागणार. सोडतांना अजिबात दु:ख वैगरे होत नाही कदाचित रहायला जरी बाहेर गेले तरी शिकायला या वास्तुतच यायचे किंवा मी कोणातच न गुंतल्यामुळे मला  काहीच वाटत नसावे. फक्त होस्टेलमधल्या आतल्या बातम्या कळणार नव्हत्या. कदाचित नोट्स मिळायला त्रास होईल एवढंच. सुनंदाला सोडतांना फार त्रास झाला नाही. तशी ती कॉलेजमधे भेटणारच आणि आमची मैत्री तशी खूप गहिरी झालीच नाही. आता जेवणाचे हाल नाही, मेट्रनचा करडा आवाज कानावर पडणार नाही, आंघोळीसाठी नंबर लावायची गरज नाही.

१२/४/१९७७

सुमी-सुहासदाचे लग्न आटोपले. सुमीने लग्नात सर्व हौस पूर्ण करुन घेतली. सुहासला हट्टाने नाव गार्गी ठेवायला लावले. तेव्हा मला कळले बाईसाहेबांना माझं नाव खूप आवडायचे. सुमी इतक तोंडात बसले होते की कोणी गार्गी म्हणेल असं वाटत नव्हतं. लग्नाला प्रसन्ना आला होता. त्याचे एन.डी.ए मधे इंटरस्टेट स्पर्धेत सिलेक्शन झालं. त्याचा आनंद गगनात मावत नव्हता. माझं लक्ष सुमीच्या लग्नात कमी आणि प्रसन्नात जास्त होतं. लग्न लावून मी त्याच दिवशी नागपूरला परतले. सुमी पाठवणीला रडलीच नाही म्हणून नातेवाइकांनी बराच गोंधळ घातला. त्या नवरा नवरीला कसलीच फिकिर नव्हती. चार दिवसात मांडवपरतणी आटपून ती चंद्रपूरला गेली. अर्थात हा वृत्तांत मला नंतर कुमुदकडून कळला.

आईबाबांची नागपूरला यायची तयारी सुरु झाली. ते या लग्नासाठीच थांबले होते. सगळ्यात वाईट जर कोणाला वाटत असेल तर ते सुधाआजीला. आजीची तब्येत ठीक नसते आणि सध्या त्यांना सोबतीची गरज आहे. बाबांनी त्यांच्या मुलींना कळवले होते. त्यातली मुंबईची सुगंधा आत्या येणार आहे आणि सुधा आजीला घेउन जाणार असे कळवले. आईबाबांना तेवढेच बरे वाटले.

२५/४/१९७७

सर्वांचे निरोप घेऊन आईबाबा नागपूरला आलेत. धंतोलीतलं ते घर छोटसंच आणि टुमदार आहे. आम्ही तिघांनी घर लावलं, सजवलं, अंगणात बाग तयार केली. नवीन रोपे आणायला हवीत. माझी खोली लावतांना आई बोन सेट ला काय घाबरली. मी तो खुंटीला अडकवून ठेवला तर तिने तो मला काढायला लावला. केव्हाची ती घरभर गंगाजल शिंपडत आहे. मी आणि बाबा खूप हसलो. शेवटी तो सेट माझ्या खोलीला लागून जिन्याची खोली आहे तिथे ठेवायचा ठरलं. आता प्रश्न आहे तो माझ्या कॉलेजला येण्या जाण्याचा. होस्टेलला राहिल्यामुळे नागपूरची, तिथल्या रस्त्यांची ओळख झाली नव्हतीच. बाबांनीच बस, बसस्टॉपची चौकशी केली. माझे बसने येणे जाणे सुरु झाले. घरुन थोडं लवकरच निघावं लागत आहे. खाण्यापिण्याचे हाल संपलेत त्याचा आनंद जास्त आहे.

२९/४/१९७७

"आता मात्र आईबाबांना सांगावंच लागणार" प्रसन्नाने माझ्याच ओळी मला परत पत्रात लिहून पाठवल्या "मला वाटलं तू वाघिण आहेस खानोलकरांची, देवदत्ताला सांगण्याचे धाडस नाही का तुझ्यात?" या ठळक अक्षरातील ओळीतून मी काय अंदाज बांधायचा. सरळ सरळ जाऊन सांग. मला काहीच कळत नव्हते? कसे सांगू? तर पत्राच्या मागच्या बाजूला त्याने लिहून पाठवलेले मला दिसले "भिउ नकोस मी तुझ्या पाठीशी आहे" याच्या मिस्कीलपणाची आता कमाल झाली. अगं तू नाही सांगितले तरी त्यांना कळणारच कारण आता तुला मी पत्र होस्टेलला न पाठवता घरी पाठवणार. सांग कुठे पाठवू घरी की होस्टेल ला? नको होस्टेलला नकोच. तिथे तर सगळेजणं यावरुन मला छळ छळ छळतील, आणि पुढचे शिक्षण कठीण होउन बसेल. त्यापेक्षा घरी सांगितलेले बरे. खरं तर मला त्यांना खूप सांगायची इच्छा आहे. कसं सांगणार?

शेवटी मी आईबाबांना सांगायचे ठरविले. बहुतेक आईबाबा हरकत घेणार नाही. असं राहून राहून वाटत होतं. गेल्या वर्षभरात माझी धीटाई कमी झाल्याचं मला वाटलं. हा माझ्यातला बदल मला मान्य करावसा वाटत नव्हता. मग संध्याकाळी आईबाबांना मी सगळा धीर गोळा करुन प्रसन्नाबद्दल सांगितलं. पाच सात मिनीटे दोघं काहीच बोलेना. माझा पडलेला चेहरा बघून मग बाबाच मिस्कील हसले आणि आईने तर तिला शंका असल्याची गुगलीच टाकली......

आज मला खूप हलकं आणि मोकळ वाटत आहे. मनावरच ओझं कमी झाल्यासारख वाटलं. मुख्य म्हणजे आईबाबांनी ते न कुरकुरता स्विकारलं, मला इतर आईवडिलांप्रमाणे कुठलंच दुषण दिलं नाही. यासाठी पाठवले का शिक्षणाला वैगरे. अशा वेळेस घरच्यांनी समजून घेणे फार महत्वाचे आहे आणि माझ्या घरच्यांनी घेतले त्याचा मला अभिमान वाटत आहे.

आज माझ्या आयुष्यातील सर्वात महत्वाची गोष्ट त्यांच्यापासून लपवून ठेवण्याची खंत, अपराधीपणाची बोच आपोआप निवळली. आता मला आमचे प्रेम यशस्वी होणार वैगरे काळजी कधीच वाटणार नाही.

कित्येक दिवसांनी मी मोकळेपणानी डायरी लिहिली. पुन्हा नव्याने आयुष्याची घडी बसली....

खूप दिवसांनी कवितेचे पुस्तक हाती घेतले. बोरकरांची क्षितिजी आले भरते गं ही कविता आठवली:

क्षितिजी आलें भरते ग
घनात कुंकुम खिरते ग
झाले अंबर
झुलते झुंबर
हवेत अत्तर तरते ग
लाजण झाली धरती ग
साजण कांठावरती ग
उन्हात पान
मनात गान
ओलावुन थरथरते ग
नातें अपुलें न्हाते ग
होउन ऋतुरस गाते ग
तृणात मोती
जळांत ज्योती
लावित आले परते ग

नचिकेत ए नचिकेत, अनुने खूपदा आवाज दिला. तो गाढ झोपला होता. तिने हळूच डायरी बाजूला केली. ए.सीचे टेम्परेचर वाढवले. आज तर त्याची ऑफिसला दांडीच आहे. त्याच्याकडे प्रेमाने बघत अनु हळूच पुटपुटली. हा डायरी वाचून काय विचार करत असेल. नेमकी आजच तिला गाईडने बोलावले. नाहीतर नचिकेतला सोडून जायची तिला इच्छा होत नव्हती. खरं प्रेम काय असतं हे तिला डायरी वाचूनच कळलं होतं. त्या क्षणी आपल्या सासूबाईंचा तिला मनोमन खूप अभिमान वाटला. त्यापेक्षाही ग्रेट म्हणजे बाबा. काहीच न बोलता त्यांनी सारं सावरलं किती मोठं मन म्हणाव त्यांचं. आपल्या आयुष्यात असं काही घडेल तिला वाटलंच नव्हतं. खरंच किती आगळी वेगळी जगावेगळी प्रेमकहाणीचा आपण निसटता का होईना एक भाग आहोत याचा तिला आनंदच होत होता. स्मृतींच्या त्या पानांतून अनिच्छेने ती बाहेर पडली.

“आजी, तुमचा स्वैयंपाक झाला आहे. तुम्ही आणि आजोबा औषधं घ्यायला विसरु नका.” आजोबांचं कानाचं मशीन त्यांना लावून देत अनु सुचना देत होती. टी.व्हीवर साममराठी चॅनल लावून ठेवलं. आजींना रिमोटने लावता येत नाही. न विसरता अनुने सगळी कामं उरकलीत. “आजी मी येतेच चार वाजेपर्यन्त. नचिकेत उठला की तो त्याचं घेईल खाऊन तुम्ही काळजी करु नका.” आजी आपल्या नातसुनेकडे कौतुकाने बघत होत्या.

तेवढ्यात नचिकेत उठलाच. त्याला चहा नाश्ता देउन अनु तयार झाली. त्याच्या चेहऱ्यावरचे भाव टिपायचा ती प्रयत्न करत होती. तो ट्रान्समधे हरवला होता हे बघून ती काहीच बोलली नाही.

नचिकेतने सांगितले पोहचल्यावर-निघाल्यावर फोन कर. फोन सायलंट मोडवर टाकून त्याने परत डायरी वाचायला घेतली.

३०/५/१९७७

किती दिवस झालेत डायरी लिहायला जमलंच नाही. कदाचित आयुष्य सुरळीत सुरु आहे म्हणून किंवा कुठलीच उर्मी उरली नाही म्हणून. एकेक दिवस पुढे सरकत होता आणि त्यासोबत माझे आयुष्यही.

घरुन कॉलेजला बसने येणं जाणं करतांना बरीच नवीन मित्र मैत्रिणी झाल्यात. नाहीतर होस्टेलमधे राहून मी त्या ठराविक ग्रुपमधेच वावरत होते. असं मला प्रकर्षाने जाणवलं. विचारांच्या देवाणघेवाणात मला इतरांच्या आयुष्याबद्दल कळत होते. नंदिनी. घरची बेताची परिस्थिती. डॉक्टर व्हायच्या स्वप्नासाठी तिने बसचा पास आमच्या स्टॉपपासून काढला होता. तेवढेच पैसे वाचतील. त्यासाठी कुठल्याकुठून पायी यायची. राजन कोल्हटकर दोन वर्ष सिनिअर, एकही पुस्तक किंवा नोट्स विकत न घेता पास होत होता. त्याचं आश्रयस्थान म्हणजे आमची लायब्ररी. ग्रेची एम्ब्रियॉलॉजी जेवढी त्यानी वाचली तेवढी अख्या कॉलेजमधे कोणीच वाचली नसवी. सोनल कदम, रुक्मिणी राजे यांच्याशी गप्पा मारतांना छान वाटायच.

माझ्या आयुष्यात खूप वर्षांनी मित्रमैत्रीणींचा प्रवेश झाला होता.....

ॲप्रन घालून बसमधे बसल्यावर हल्ली कंडक्टर पास बघत नव्हता. किंवा आमच्या पैकी कोणी तो रिन्युव नसेल केला तर ज्याचा चालू आहे तो एक जण दाखवून मोकळा होत असे. बस मधे गप्पा रंगत होत्या.

हळूहळू मी सर्वांसाठी काहीतरी खायला आणू लागले.

१५/६/१९७७

परीक्षेला अजून सहा महिने होते. अभ्यासही भरपूर आहे. मीही प्रत्येक नोटस विकत घेणे हळूहळू बंद केले. लायब्ररीतल्या चकरा वाढल्या. सिनिअर्सच्या मदतीने पुस्तक शोधून नोट्स काढून अभ्यास करु लागले.

आता माणसांच्या डिसेक्शनची भिती अजिबात वाटत नव्हती. डबा खायला आधी आम्ही कॉलेजच्या इमारतीच्या बाहेर जायचो. आता सगळ्याच वासांची सवय झाली होती. थोडक्यात डॉक्टरकी माझ्या अंगात भिनायला लागली. शेजार पाजारचे सर्दी खोकल्याचे औषध विचारायचे किंवा अमका डॉक्टर चांगला का कुठल्या डॉक्टरपाशी जाऊ असे प्रश्न विचारले की आईबाबांना मी डॉक्टर झाल्यासारखीच वाटायची.

आत्या मावशी तर पत्रात हमखास आमची डॉक्टरीणबाई काय म्हणते? म्हणून उल्लेख करत.

३०/६/१९७७

आमचे आयुष्य आता सुरळीत चालू आहे. प्रसन्नाचे पत्रं येत रहातात. कुमुदचे खूप दिवसांनी पत्र आले. म्हणून डायरी आठवली. ती चंद्रपूरच्या जवळ एका कॅम्पला जाणार आहे. सुमीकडे दोन दिवस रहाणार आहे. तेव्हा या दोघींच्या आठवणीने मन भरुन आले. कित्ती गोष्टी आम्ही एकमेकींशी शेअर करत होतो. पहिला शाळेचा दिवस, पहिला निकाल, पहिला कॉलेजचा दिवस, पहिले प्रेम खूपशा आठवणी दाटून आल्यात.

लहानपणच्या या आठवणीतही वेगळेच सुख दडलेलं असतं, नाही? आमच्या शाळेतले काही फोटो सामान लावतांना दिसलेत ते मी या डायरीत चिटकवून ठवेलेत. खूपशा जणांचा काहीच पत्ता नव्हता. कोण कुठे गेलेत? काही ऋणानुबंधाच्या गाठी जोडून. ठाऊक नव्हते आयुष्यात पुन्हा कधी भेटतील का? आणि समजा भेटलेच तर ओळखतील का? काय मजा असते ना. आपल्याला आयुष्याच्या प्रवासात कितीतरी माणसं भेटतात, काही शेवट पर्यन्त सोबत रहातात, काही अर्ध्यावाटेवर सोडून जातात....

२५/७/१९७७

आज आमच्या बॅचची हॉस्पिटलला रवानगी करण्यात आली. आम्हाला आजवर हॉस्पिटलला दिवसभरासाठी पाठवले नव्हते. तास दोनतास आम्ही तिथे घालवलेत. कॉलेजमधे सिनिअर्सकडून जे ऐकण्यात आले हॉस्पिटलबद्दल तेवढीच माहिती होती. एक पांढरी टोपीवाला मारोती आम्हाला "गाईड" करत होता. आधी फाईलींग "शिश्टीम" त्याने समजवून सांगितली. तेवढ्यात एका सिस्टरने आमचा ताबा घेतला. केस पेपर कसे वाचायचे, समजायचे, प्रत्येक पेशंटचे वेळापत्रक, त्यांच्या तपासण्या इ. इ. सगळी बेसीक माहिती आम्हाला मिळाली. नंतर आम्हाला जनरल वार्डात नेण्यात आले. तिथे आमचे ग्रुप करुन एक एका डॉक्टरच्या मागे आमच्या पाच -सहा जणांचा तांडा चालला होता. ते जे सांगत ते आम्ही टिपून घेत होतो. त्यांना स्टेथिस्कोप देण्यापासून तर ते रोगाचे निदान कसे करतात. कुठली औषधं देतात. हे करतांना आधी मजा आली. दिवसाला पन्नास साठ पेशंट तपासून आम्ही दमलो होतो. डॉक्टर मात्र दमलेले वाटले नाही. डॉ.देवाशिष गोडबोले, अतिशय गंभीर आणि टू द पॉईंट बोलणारे. आम्ही जरा जरी मस्ती करण्याचा प्रयत्न केला की त्यांची करडी नजर बघून डोळे आपोआप खाली व्हायचे.

आजचा दिवस टायरींग गेला. रात्री घरी आल्यावर आईच्या हातचं गरम गरम जेवणाने सगळा थकवाच घालवला.

२०/८/१९७७

हल्ली रोजच थकायला होतं आहे. घरी आले की अभ्यास नको वाटतो. होस्टेलला राहून लागलेल्या सगळ्याच सवयी मोडल्यात. कपडे आईच धुते, खोली आईच आवरते, थोडक्यात आई माझी खूप काळजी घेते.

कुमुदचं पत्र येउन आठ दिवस झालीत. वाचायला जमलं नाही. आज अभ्यासाला दांडी. कुमुदच्या पत्रात नेहमीचंच. सुमीचा संसार छान सुरु आहे. तू एकदा तिला भेट असा आग्रह होता. परस्पर काही निर्णय घेतलेत आपल्या भाऊरायांनी आणि गार्गी-२ उर्फ सुमीबाईंनी जरा समजवून सांग. नक्की काय त्याचा उल्लेख केला नाही. आता मला कळणार तरी कसं तिला काय झाले ते. आता ही हुरहुर कारण कळल्याशिवाय जाणार नाही. आईला काही माहिती आहे का उद्या विचारु. विचार सारण्यासाठी मी रेडिओ लावला. हवामहल कार्यक्रम नुकताच संपला होता. माझ्या वाढदिवसाला प्रसन्नाने पाठवलेले पत्र परत परत वाचते. तिथे एन.डी.ए.त पठ्ठ्याने आपल्या मिस्कील स्वभावाने सगळ्यांना जिंकले. दरवेळेस नव्या मित्राचा उल्लेख असतो.

आता असं वाटायला लागलं माझा मेडिकलचा अभ्यास लवकर लवकर संपावा आणि लवकर लवकर लग्न करुन टाकावं. माझ्या या विचारांचे मलाच आश्चर्य वाटले. मी आजवर कधीच असा कधीच विचार केला नव्हता. मला हे काय होतं आहे. असले विचार येताच मी माझं ध्येय काय आहे स्वत:लाच बजावून सांगते.

३०/९/१९७७

परीक्षा जवळ आली आहे. खूप अभ्यास करायला हवा. आजच सुनंदा भेटली. खूप काळजीत दिसली. फार बोलली नाही. नंतर कळले तिचे नापास होण्याचे दुसरे वर्ष आता एकच अटेम्ट बाकी होता. नाहीतर ॲडमिशन कॅन्सल. ऐकून माझ्या पोटात गोळाच आला. आज परत हॉस्पिटल राउंड झाला. जनरल वार्डात राघव नावाच्या मुलाची डेथ झाली. नातेवाईकांचा गलका, त्यांच रडणं ऐकवत नव्हतं. हातातोंडाशी आलेला मुलचा अपघात आणि जब्बर मारामुळे उपचारादरम्यान मृत्यू. आम्ही सारेच हळहळलो. बिचारा शुध्दीवर आला नव्हता. का कोण जाणे त्या किंकाळ्या अजून ऐकू येत होत्या. आजवर इतके पेशंटस तपासले, कित्येक पेशंटसने माझ्यासमोर दम तोडला असेल हा राघव डोळ्यापुढून जात नव्हता. त्याच्या आईवडिलांकडे बघवत नव्हते. त्यांच्या डोळ्यात, दु:ख, काळजी, असह्यता दिसत होती.

१५/१०/१९७७

परीक्षेची नोटीस आज बोर्डावर लागली. सर्वांचे चेहरे मला गंभीर वाटू लागले. अर्थात मी गंभीर झालेच. पहिली परीक्षा पहिली टर्म. दीड वर्षांनंतर अखेर परीक्षेचे दिवस खूपच जवळ आल्याचे वाटले. मी थोडी उत्सुक आहे थोडी काळजीत आहे. संमिश्र विचारांमधे माझा अभ्यास सुरु आहे. एव्हाना मेडिकल कॉलेज आणि हॉस्पिटल आमच्या अंगवळणी पडलं होतं. तिथला स्टाफ, ड्यूटी बदलायच्या आधीची धावपळ,

तेवढ्यात इमरजन्सी आली तर विचारुच नका, या रोजच्या घाईत ती घाई. दिवसातून एका पेशंटचे केस पेपर किती जणं हाताळत असतील. प्रत्येक वार्डात पेशंटसच्या लांबच लांब रांगा, बरेच पेशंटस जे जवळच्या गावाहून यायचे, त्यांच्या नातेवाइकांचे तिथेच बस्तान असायचे. कधी झाडाखाली, बहूतेक करुन कॅन्टीनच्या जवळपास ही मंडळी कायम घुटमळतांना दिसायची. त्यांची स्टाफ सोबत बाचाबाची चालली असायची. एका पेशंटसाठी इतकेजणं बघून मला आश्चर्य वाटायचं. यांना काही काम वैगरे नसतं का रे? मी एकदा शेखरला विचारलेच. नसावंच, मी तरी इथे एका पेशंट जवळ कायम घोळकाच बघितला. एखाद दुसरा एकटा दुकटा असतो. केसपेपरचे इकडून तिकडे होणे, पेशंटसच्या नावातील गडबड या सर्वांची सवय होते आहे. आधी मी छोट्या छोट्या गोष्टी मनाला लावून घ्यायची पण राजन आणि नंदिनीचे आभार, त्यांनी मला ही स्थिती हाताळण्यास शिकवले. एवढे मोठ्ठं कॉलेज, एवढा स्टाफ, रोजचे हजारोंनी तयार होणारे केस पेपर्स, थोडा गोंधळ होणारच अशी अथक प्रयत्नांनी मी माझ्या मनाची समजूत काढली.

३०/११/१९७७

ऐन दिवाळीत आमची परीक्षा. शिवाय ओरल्स आणि प्रॅक्टिकल्स बद्दल खूप ऐकलं आहे, एकवेळ पेपर सोपा आणि छान जाईल पण ओरल्स ते खूपच टफ असतं. हे मेडिकल कॉलेज यासाठी प्रसिध्द असल्याचं मला कळलं. त्यामुळे जरा टेन्शन आलं. सबमिशन्स सगळे आटोपले. आपल्याला चांगले सिनिअर्स भेटलेत तर मेडिकलच्या पहिल्या परिक्षेची वाट सुलभ होते असं माझ्या लक्षात आलं. कुठलासा कॅम्प आहे आणि फर्स्ट टर्मच्या मुलांना कंपल्सरी आहे ही चर्चा उडत उडत ऐकली. नंतर कळले नवीन मुलांच रॅगींग घेता यावे म्हणून सिनिअर्सनी पसरवलेली अफवा होती.

सुधाआजीचे पत्र आले होते. मुंबईला तिला करमत नाही. मला वरुन निरोप येईल त्या आधी एकदा भेटून जा लिहिले आहे. हे आमच्या सुधाआजीचे स्पेशल टॉक - ती सरळ सरळ कधीच बोलायची नाही. विरुध्दार्थी किंवा इनडायरेक्ट. मला तर नेहमीच त्रास द्यायची. "चिंगे माझी म्हैस गेली गोठा सोडून आण तिला पकडून" म्हणजे आजीकडचं दूध संपल आहे, ते आणून दे, आज चूल संपावर आहे म्हणजे गॅस संपला आहे.

त्यांच्या आठवणीने मला आणि आईला गलबलून आले. सुधाआजीच्या विषयामुळे मला प्रसन्नासोबत घालवले क्षण आठवलेत. ती गच्ची, मावळतीचा सूर्य, कधी भरभरुन गप्पा, कधी निशब्दता, हातातहात घालून केलेली ती भटकंती. वर्धा सोडलं आणि तसे क्षण माझ्या आयुष्यात परत आलेच नाही. प्रसन्नाशी मोकळेपणानी गप्पा मारायला या दीड दोन वर्षात वेळच मिळाला नाही. आज बाबांनी आमच्या बद्दल प्रसन्नाच्या आईवडिलांशी बोलू का? असं विचारलं. मी प्रसन्नाला पत्र लिहिलं. या बाबतीत त्याचे मत गरजेचे होते.

२०/१२/१९७७

प्रसन्नाने परत आठ-दहा ओळी हा-हा-हा-हा लिहून पाठवल्यात. तुला काय वाटलं माझ्या घरच्यांना कल्पना नाही. माझ्या आईने तुझ्यासाठी शालु पसंत करुन ठेवला आहे. दागिने झालेत. कारण मला माहित आहे. तुला खरेदी, नटणे यात इंटरेस्ट नाही. माझ्या आईची निवड तुला आवडेलच.

आणि गार्गी प्रसन्ना केतकर नावाच्या चार-पाच ओळी. हे माझं स्वप्न आहे प्रिये, खरं तर तुच वाघिण निघाली. मी वाघ होऊन घरच्यांसमोर केव्हा जाऊ याचाच विचार करतो आहे. प्रसन्नाची ही गम्मत मला अजिबात आवडली नाही. मी त्याला लवकर वाघ हो, घरच्यांना सांग एवढ्याच ओळींच पत्र पाठवले. तर त्याने चक्क कोरा कागद कागद धाडला. एक नोट तेवढी लिहिली होती- "आईबाबा सध्या रावळपिंडीला आहे. पुण्यात बाबा येणार तेव्हा बोलतो तू काळजी करु नकोस. आणि हो मी ट्रेनींगला जाणार आहे. कुठे?काय? सध्या सांगत नाही. महिनाभर तरी पत्र पाठवू शकणार नाही. जायच्या आधी नक्की पत्र पाठवीन."

प्रसन्नाची भेटही नाही आता पत्र येणार नाही या कल्पनेने मला रडायलाच आले.

२५/१/१९७८

काय भर्रकन संपले हे वर्ष आणि पहिल्या महिन्याचा शेवटचा हप्ता येउन ठेपला. प्रसन्ना त्याच्या आईवडिलांशी बोलला. लगेचच त्याच्या वडिलांचे पत्र आले. त्यांनी त्याचे ट्रेनींग संपले की रीतसर साखरपुडा उरकून घेऊ लिहिलं होतं. मावशीकडे फेब्रुवरी मधे अमेयची मुंज ठरली आहे. यवतमाळला मला जाणं जमेल असं वाटत नाही. नेमकी तेव्हाच साकोलीला आमचा आठ दिवसांचा कॅम्प आहे. कॅम्पला जावं तर लागणारच.

मुंज का कॅम्प.....

आताशा अशा विवंचनाचा त्रास होत नाही अं.. मी करुन घेत नाही.

१५/२/१९७७

अशा कॅम्पमधे खूप काही शिकायला मिळतं. कमीतकमी मेडिकल इंस्ट्रुमेन्ट्स वापरुन उपचार कसे करायचे, डिसिज़न मेकिंग स्कील आपोआप येतं, आपला कॉन्फिडन्स वाढतो अजून बरेच काही.

साकोली गाव छोटसं. जंगलानी वेढलेलं. सरकारी दवाखान्यात इन्जेक्शन असेल तरच लोकं यायचे नाही तर वैदूबाबाचे औषध जास्त करुन घेतात. फर्स्टएड, हायजीन, स्वच्छता शिकवता शिकवता आमची पुरेवाट झाली. आपात्कालीन परिस्थितीत भंडारा किंवा गोंदियाच्या दवाखान्यात जावं लागतं. ओ.टी..लॅब असलेला दवाखान्याचे काम जवळ जवळ पूर्ण झाले होते. थोडक्यात आमचा सर्व्हे कम चेकअप कॅम्प मस्त झाला.

२८/२/१९७७

प्रसन्नाने महिनाभर पत्र लिहू शकणार नाही असे पत्रात लिहिले होते. त्याची जुनीच पत्र मी रोज वाचते.

आजच सावित्रीकडून आमच्या होस्टेलची मेट्रन पळून गेल्याचे कळले. तिच्याशी माझा फार दिवस सबंध आला नव्हता. होस्टेलवर काही मुलींनी नवीन वर्षाची पार्टीचा गोंधळ घातला आणि बरेच काही कानावर आले. त्या मुलींचा निकाल राखून ठेवणार अशी नोटीस बोर्डावर वाचली तेव्हा हे प्रकरण कळलं. बरं झालं आपण होस्टेल सोडलं. एवढ्या मोठ्या कॉलेज आणि हॉस्पिटलच्या आवारात नेहमीच काहीबाही ऐकायला मिळायचे. आमचा ग्रुप या भानगडीत पडत नसे. आमचा अभ्यास, लायब्ररी आणि गप्पा मस्त चालले होते आयुष्य.

आजकाल डायरी लिहायला होतच नाही. अधूनमधून लिहिलं की बरं वाटतं.

आठवणींना उजळण्याची मला आता सवय लागली होती.

१८/३/१९७७

सुमीच्या दुसरे ॲबॉर्शन झाले, हे आईकडून कळलं. पहिलं तर तिने आणि सुहासदाला एवढ्यात मुल नको म्हणून कोणालाच न कळवता परस्पर उरकून घेतलं. या वेळेस दोन महिन्याचच गर्भ पडून गेला. चंद्रपूरलाच क्युरीटीन करुन घेतलं. मला हे ऐकून रागच आला. एरवी मी कुठली गोष्ट सांगत नाही म्हणून वारंवार रुसणारी सुमी मला आठवली. तिचा अबोला, माझ्या मनधरण्या आणि आता एवढी मोठी गोष्ट! पठ्ठीने साधे कळवलं नाही.

कुमुद समिती आणि आश्रमशाळेच्या कामात खूप गुंतलेली दिसली. ते तिच्यासाठी चांगलंच होतं. ती दुसऱ्या लग्नाचा विषय काढू द्यायची नाही. नरुमावशीची तब्येत बरी नसते. कुमुदच्या काळजीने अजून खराब होते आहे. काकांना जाऊन वर्ष होईल. दादा वहिनी सगळं सांभाळतात. कुमुदने घरी शिकवणीचे वर्ग सुरु केलेत आणि आश्रमशाळेत पार्टटाईम जॉब करते. दिवसेंदिवस तिचा अलिप्तपणा वाढतच आहे. एका प्रसंगाने एका हसऱ्या खेळत्या मुलीचे आयुष्य उध्वस्त केले. नको नको तेच मला का आठवतं ठाउक नाही. मी खूपदा विसरण्याचा प्रयत्न करते. मी विसरु शकत नाही तर ती कशी काय विसरणार? हे तिचं प्रारब्ध आहे? आई म्हणायची कितीही काही झालं तरी ज्याचे भोग त्याला मिळणारच. काही जखमांच ओझं वागवतच आपल्याला आयुष्याचा प्रवास करावा लागतो.

२७/५/१९७७

कडाक्याचं उन आहे. सकाळी सकाळी बस मधे झावा लागत आहेत. आज नंदु -नंदिनी आली नाही.

आमच्या ग्रुप मधले सारेच पास झाले. आता काय लगेचच पुढच्या टर्मची तयारी करायची. अभ्यास वाढत आहे. बाबांनी साखरपुड्याची तारीख काढली. जुलैमधे १४ तारखेला. साखरपुडा नागपूरला करायचा ठरवला. लग्नाचे बघू. प्रसन्नाला विचारु असे त्याचे बाबा म्हणत आहेत. मला मेडिकल पूर्ण झाल्याशिवाय लग्नाचा विचारच करायचा नाही.

रविवारी धनवटे रंगमंदीर मधे पुस्तकांचे प्रदर्शन लागले आहे. जायला हवे. खूप दिवसात सिनेमा नाही, रेडिओ तेवढी सोबत करतो. घरी असलेली सगळीच पुस्तकं वाचलीत. आता नवीन काहीतरी वाचायला हवे. हल्ली विरंगुळा म्हणून मी आठवणींमधे जास्तच रमते असं मला लक्षात आलं.

१५/६/१९७७

प्रदर्शनातून बरीच पुस्तकं विकत घेतलीत. बाबांचाच वाचनाचा छंद मला लागला. तांबे, बोरकर, कुसुमाग्रज माझे आवडते कवी. सुरेश भटांचे रुपगंधा ही मिळाले. प्रसन्नाचे पत्र वाचतांना त्यांचीच एक कविता आठवली

तू लिहेलेल्या
चारच रेशमी ओळींच्या कोशात
माझ्या स्वप्नांचे फुलपाखरु
    काना.मात्रा आणि वेलांट्यांत
    पाय अखडून
    पहुडले आहे...
आपले न फुटलेले पंख
    सहीजवळ मागत !

मला वाटलं भटांनी या ओळी माझ्यासाठीच लिहिल्यात. आजवर मी भटांच्या कविता वाचल्या नाहीत. ते फक्त गज़लच लिहितात आणि मला ती समजत नाही म्हणून मी ते टाळत होते. आज त्यांच्या कविता वारंवार वाचावश्या वाटताहेत. जणु माझ्या मानातील गुज माझी हुरहुर त्यांनी शब्दात हेरली होती.

१८/७/१९७७

प्रसन्नासोबत आठ दिवस कसे पटकन सरले. खूप दिवसांनी आम्हाला आमच्या साठी खूपखूप वेळ मिळाला. प्रत्येक क्षण मी वेचायचा प्रयत्न करत होते. त्याच्या सहवासातला एकएक क्षण मी जपून ठेवला. परत तो निघण्याचा आणि माझ्या हुरहुरण्याचा क्षण आला. यावेळेस काय कोण जाणे मनाला रुखरुख लागल्या सारखी वाटली. आपल्या नेहमीच्या मन वळवण्यात पटाईत असलेल्या प्रसन्नाने मला मनवलेच. परत आणा भाका डोळ्यातले गुज आणि विरहाच्या वेदनांनी होणारे दु:खाचे आभास. मला हे क्षण नकोसे झालेत. एकदा वाटलं हे शिक्षण सगळं सगळं सोडून आत्ताच त्याच्या सोबत निघून जावं. आजवर मी आणि माझे मन इतके हतबल कधीच झाले नव्हतं.

आठवते-
बांधला होता
उगीच आपला
अंधाराच्या किनाऱ्यावर
वाऱ्याच्या निसटत्या वाळूत
चिमिणीचा खोपा
लपण्यासाठी !

आज हा खोपा मला हरवल्यासारखा- निसटल्यासारखा वाटत आहे.

२७/७/१९७७

इतक्यात प्रसन्नाची आठवण जरा जास्तच येते आहे. कदाचित आईबाबांनी हे हेरलं असावं. बाबांनी नटसम्राट नाटकाची तिकिटं आणलीत. डॉ.लागु त्यांचे आवडते नट. त्यांना प्रत्यक्ष बघता यावं म्हणून पहिल्या रांगेचं तिकिट त्यांनी आपल्या एका विद्यार्थीनीकडून काढून घेतले. या नाटकाविषयी खूप ऐकले आणि खंरच बघण्याचा योग आला. नाटक छानच होतं. अप्पा बेलवलकर आणि सरकार खूप दिवस डोक्यात घर घरुन होते. डोळ्यासमोर नाटक आणि मनामधे प्रसन्ना अशा दूहेरी मनस्थितीत मी ते बघितलं. आमचा आता साखरपुडा झाला आहे, तरी एक अनामिक हूरहूर मनाला सतत का बोचते?

२१/८/१९७७

यंदाही माझा वाढदिवस आला आणि गेला. मित्र-मैत्रिणींना कँन्टीन मधे ट्रीट, धमाल, मस्ती आणि गप्पा.

सुनंदा खूप दिवसात कँम्पसमधे दिसलीच नाही. सावित्रीकडून ती मेडिकल सोडून गेल्याचं कळलं. कॉलेजमधे अनेक प्रेमकथा जन्माला येत होत्या, काही तुटत होत्या. मी या सर्वांपासून अलिप्त रहाण्याचा प्रयत्न करत होती.

आमच्या ग्रुप मधे सगळ्यांनाच माझ्या साखरपुड्याबद्दल माहिती झाले होते त्यामुळे माझ्याभोवती संधीसाधू मुलांचा तांडा फिरायचा आता तो फिरणे एकदमच बंद झाले. दुरुनच हाय हेलो होऊ लागले. नंदिनी, सोनल, मंजिरी कँन्टीनमधे चिडवत होत्या. तुझ्या साखरपुड्यामुळे आता ते आमच्या सुध्दा मागे येइनासे झाले. नंदू अर्थात नंदिनी, सोनु अर्थात सोनल,मंजू अर्थात मंजिरी, शेखू अर्थात शेखर, मंगू अर्थात मंगला, जयू अर्थात जयमाला, धनू अर्थात धनश्री अशी माझा ऊ-कारत्मक ग्रुप. सारेच अभ्यासु. फालतू उनाडक्या, भानगडींमधी आम्हाला अजिबात रस नव्हता. याच ग्रुपने माझ्या गार्गीचे गारु असे नामकरण केले.

सेकन्ड टर्म सुरु झाली. कॅम्पसमधे नानाप्रकारच्या बातम्या ऐकायला यायच्या. आम्ही इतर कार्यक्रमांत भाग घ्यायचा नाही असं ठरवलं. तेवढी वादविवाद स्पर्धा मात्र आम्ही सोडत नाही. शेखू, धनू शाब्दिक मस्त असायचे. दोघेही तावातावात बोलतात आणि समोरच्याला आपलं म्हणणं पटवूनच देतात. त्यांच्या राज्यात आजवर ही स्पर्धा कोणीच जिंकली नाही. असं आमचं सेकण्ड टर्म दंगा मस्ती आणि अभ्यासात सुरळीत चाललं होतं.

१७/९/१९७७

सध्याचं शेड्युल खूपच बिज़ी आहे. कॉलेजला लवकर जाते. एक्स्ट्रा लेक्चर्स असल्याने जावं लागतं. मुंबईहून बाबांच्या ऑफिसमधे अर्चना आत्याचा फोन आला होता. “सुधा आजीला अजिबात बरं नाही. सारखी तुमची आठवण काढते एकदा भेटायला या.” आईची ईच्छा दिसली. सहाजिकच आहे म्हणा इतक्या वर्षांचा सहवास. दूर असले तरी माया थोडीच कमी होणार. मी दोघांना बळे बळेच जायला तयार केलं. घरी काय चारदिवस माझ्या मैत्रिणी राहतील. बाबा उद्याच तिकिटं काढणार होते. मैत्रीणीतर टपलेल्याच असतात. झालं चार दिवस आमचं घर गोकुळ होणार. आईने चार दिवसांसाठी चिवडा, लाडू, शंकरपाळे काय काय पदार्थ करुन ठेवलेत. स्वैंपाकासाठी बाई लावली. बाप रे! घराची जवाबदारी अंगावर पडताच जुने-पुराणे दिवस आठवले. आईला बरं नसतांनाचे ते दिवस आठवले. तेव्हा मला कळले घर सांभाळणं म्हणजे काय असतं ते.

१५/१०/१९७७

पुढच्या महिन्यात आईबाबांचा लग्नाचा एकविसाव्वा वाढदिवस आहे. काहीतरी विशेष केलं पाहिजे. सुमीचे पत्र आलं. तब्येत बरी नाही. नवरात्रात तिला फुडपॉयज़निंग झालं, त्याचा अजूनही त्रास होतो आहे.

पट्ठी पथ्य नीट पाळत असेल का? औषध व्यवस्थित घेत असेल का? याबाबतीत ती एकदम आळशी आहे. या उलट कुमुद वेळचेवेळ सगळं करते.

कुमुदला आश्रमशाळेच्या संस्थापकाच्या मुलाने मागणी घातली. सलील गुंदेचा, मारवाडी आहे. खूप वर्षांपासून कुमुदला ओळखतो आणि तिची पार्श्वभूमी माहित असून तो तयार झाला. कुमुदच्या घरच्यांनी लगेच हो म्हंटलं. कुमुद तयार होईना. दादा नागपूरला आला असतांना मला कुमुदशी बोलायला सांगितलं. कुमुदला मी लगेच पत्र लिहिलं. आयुष्यालाही एकदा दुसरा चान्स देऊन बघावं. सगळ्यांनी समजावल्यावर ती लग्नाला तयार झाली.

४/११/१९७७

आईबाबांचा लग्नाचा वाढदिवस छान झाला. आत्याची खूप दिवसांनी भेट झाली. ती पंधरा दिवस सुहासदा-सुमीकडे राहून आल्यामुळे मला त्यांची बित्तंबातमी कळली. अजूनही आत्या तिला सुनबाई म्हणतच नाही. तुझी मैत्रीण तुझी मैत्रीण म्हणते.

कुमुदचे मला पत्र आलं. चान्स देणार दुसरा आणि शेवटचा. एकदा परत डाव मांडून बघते, नियतीला काय मंजूर ते बघू. आमच्यासाठी ती तयार झाली हेच खूप होतं. असो. लग्न वर्धेला १८डिसेंबरला साध्या पध्दतीने करण्याचे ठरलं. खरंच हे ऐकून मला खूप आनंद झाला.

यंदाची दिवाळी स्पिरीट आणि औषधांच्या वासातच गेली. मेडिकल म्हंटले की सणवार... सगळंच विसरायचं. आमचे आयुष्य म्हणजे पेशंटस, दवाखाना, निर्जीव शरीराची कापाकापी आणि स्पिरीट-फिनाईलचा संमिश्र वास. एखाद्याला जर रात्री झोप येत नसेल तर फिनाईल किंवा डेटॉल का नाही हुंगलं, नाहीतर बोनसेट डोळ्यापुढे ठेवायचा, असली विचारणा व्हायची. आमच्या कॉलेजमधे सांस्कृतिक कार्यक्रम भरपूर प्रमाणात होत असतात. ते अरेंज करणारा ग्रुप वेगळा आहे. अगदी रांगोळीपासून ते निवेदन आणि बॅनर्स तेच तयार करतात. ही मंडळी अभ्यास केव्हा करतात? मला न उमगलेलं कोडचं आहे. हे सगळं सांभाळत ते कॉलेजमधे टॉप करायचे. मी अगदी सुरवातीला इमारतीच्या रौप्यमहोत्सवासाठी काम केलं. नंतर समजलं की ते किती क्लेषदायक असतं, तेव्हापासून आजवर कुठल्याच कार्यक्रमात मी भाग घेतला नाही, घेणार नाही.

२०/१२/१९७७

कुमुदचे लग्न अगदी साध्या पध्दतीनं झालं. सलील गुंदेचा माणुस समजुतदार आणि साधा वाटला. चला कुमुदच्या आयुष्यात प्रेमाचे क्षण आले या कल्पनेनेच मला बरं वाटलं. त्याचे वर्धेला स्वत:चे वर्कशॉप आहे, शटर्स आणि इतर लोखंडीकामाचे. आर्थिक परिस्थिती चांगलीच आहे. त्याचे आईवडिल, आत्या, मामा मिळून अनाथ मुलांसाठी संस्था चालवतात. कॉलनीत या लग्नाबद्दल लोकं नको नको ते बोलले. हे मला नंतर सुमीच्या वहिनीकडून कळलं. असो, कुमुद सेटल झाली याच्या आनंदात या इतर गोष्टींना काहीच अर्थ नव्हता.

उद्यापासून माझी हॉस्पिटलला फुल टाईम ड्यूटी आहे. एकच आठवडा.

३/१/१९७८

परत एकदा कॅलेंडरवर नवीन वर्ष बदललं. माझ्यासाठी हे वर्ष काय घेऊन आलाय काय माहिती. प्रसन्नाचे पत्र खूप दिवसात आले नाही. मनाला उगीच हूरहूर लागते आणि जीव कासावीस होतो. कशातच लक्ष लागत नाही.

गेला आठवडा खूपच हेक्टीक गेला. दिवसाला चाळीस पन्नास पेशंटस, वेगवेगळे डॉक्टर्स, प्रत्येकाचा स्वभाव वेगवेगळा, कोणी चिडकं, तर कोणी भरभर बोलणारे, कोणी काहीच न बोलणारे, कोणी तुटक वागणारे. जनरल वार्डातल्या अकरा नंबरच्या बेडवरील पेशंटला औषधाचा डोज़ किती दिला हे डॉ. दिक्षित सांगायलाच तयार नाहीत. ग्रॅम..मिलीग्रॅमसाठी त्यांनी मला खूप छळलं. शेवटी सिस्टरच्या विनवण्या करुन ते मिळवलं तेव्हा कुठे माझा रिपोर्ट तयार झाला.

देव करो आणि ओरलला हे सर न येवोत. काही डॉक्टर्स फारच हेकड तर काही अति फ्रेंडली वागत असे. यात देवघरे डॉक्टरांचा कधी कधी खूप राग यायचा. ते कायम गरज असो वा नसो मदतीचा हात आधी पुढे करायचे. शेखू म्हणायचा हे आम्हाला अशी मदत का नाही करत. कॉलेजमधले बरे वाईट अनुभव माझं जीवन समृध्द करत आहेत. या वर्षीची नवी बॅच छान आहे. या बॅचमधे मुली जास्त आहेत.

२५/३/१९७८

गेला महिना कसा गेला ते कळलच नाही. असं पहिल्यांदाच झालं. मी गेल्या महिन्यात एकदाही डायरी लिहिली नाही. कवितेचा नेम तर गेल्यातच जमा आहे. अताशा एकदापण लिहायला मिळू नये म्हणजे काय.

सुधा आजी वारल्याची बातमी कळली. सुटली एकदाची. खरंच अंथरुणावर आयुष्य किती अगतिक होऊन जातं, ते मी खूपदा हॉस्पिटला बघितले आहे.

अंथरुणाला खिळलेल्या पेशंटसच्या डोळ्यात मला नेहमीच मृत्यूची आस दिसायची. जगणं देखिल असह्य आणि अगतिक व्हावं मला बरेचदा बघवत नव्हतं. अताशा हॉस्पिटलमधल्या रुग्णांच्या कथा परीचित होत होत्या. जगणे आणि मरणे यातील विसंगती मी बघत होते...अनुभवत होते.

दोन दिवस उपचाराला आलेला रुग्ण कधी ठणठणीत बरा होत असे, तर कधी थेट स्मशानात जात असे. आयुष्याचा हा लपंडाव तर अजून बरीच वर्षे चालणार आहे.

मी कितीही धीट असले तरी बर्न वार्डात मी कधीच जात नाही. मागे एकदा गेले तेव्हा मलाच चक्कर आली. भीषण, विदारक, जखमांमधे गुंडाळून ठेवलेले जीवन-मृत्यूच्या दारात अडकलेले ते अर्धमेले जीव मी बघूच शकले नाही. या रुग्णांसाठी आपण काहीच न करु शकण्याच्या जाणीवाने हुंदके अनावर होतात आणि आपल्याला चीड आली असता ती कोणावर व्यक्तही करता येत नाही.

१०/४/१९७८

सेकन्ड टर्मचे जरा नाही भरपूर टेन्शन आले आहे. अर्धा जीव अभ्यासात, अर्धा प्रसन्नात गुंतला आहे. बरेच दिवसात त्याचे पत्र आले नाही. खूप दिवसांनी माझ्या खिडकीतून चंद्र बघायला वेळ मिळाला. आज तोही उदास उदास वाटत आहे. प्रसन्नाचे पत्र आले नाही की मन खूपच उदास उदास होतं आणि हल्ली तर एकटंच रहावं जवळ कोणीच नको, एकांत आणि मी दुसरं-तिसरं कोणी नको.

नंतर प्रसन्नाचा फोटो बघितला की हे मळभ दूर होऊन जातं.

कधी कधी

कधी कधी कोणाची सोबत ही नकोशी होते
कोणात अडकायच नाही,कोणाला गुंफायचं नाही
आपण असंच चालत रहावं......एकटं.....
कधी कधी आठवणी ही नकोशा होतात
उगाच उगाळायच्या नाही,उजाळायच्या नाही
आपण असच चालत रहावं....एकटं....
कधी कधी सगळे आवाज नकोसे होतात
तो गोंगाट..ती कलकल ...ऐकायची नाही
आपण असच चालत रहावं....एकटं....
निशब्द...निसंग...चालत रहावं..एकटं...
अनाहुतपणे...सोबत असून नसल्यासारख
शब्दांच्यापलीकडच,आठवणींच्यापलीकडच

अंतर्मन आवाज न करता बोलतं....मग
आपल्याला...ती सोबत..त्या आठवणी....ते आवाज..
सगळच हवहवसं वाटतं..........

अरे मला तर चक्क कवितेच्या ओळीच सुचल्या. माझी ही दुसरी कविता. खरंच प्रेमात जादू असते ना. मी तीच तर अनुभवते आहे.

१८/५/१९७८

आज कॉलेजमधे फारच गोंधळ होता. फिजीओलॉजीत बेडकाच्या डिसेक्शनवरुन नम्रता वर्मा आणि अनिल खंडागळेच जोरदार भांडण झालं.

मग कळलं अनिलने नम्रताने केलेलं डिसेक्शन, ती डिपार्ट्मेन्ट्च्या बाहेर गेलेली बघून तिला न विचारताच अनिल स्वत:च्या नावे खपवून मोकळा झाला. असले किस्से कॉलेजवर नेहमीच घडत असे. या वरुन नम्रताने आकाश पाताळ एक केले... दोघांना डीनने बोलावल्यामुळे प्रकरण जरा जास्तच पेटले. मला पॅथलॉजी आणि फरमॅकॉलॉजी पैकी पॅथलॉजी जास्त आवडले.

इतक्यात “कमी बोलते.” अशी आईची तक्रार असते. माझ्याही ते लक्षात आलं होतं. आधी कॉलेजवरुन घरी आल्यावर मी दोघांशी खूप गप्पा करायची, शेजारचे, नातेवाइक यांची चौकशी करायचे. त्यामुळे मी कोणाला भेटत नसले तरी सर्वांबद्दल माहिती असायची. गेल्या महिन्यापासून माझ्यातला हा बदलं मलाही जाणवला. आता मी सरळ आपल्या खोलीत जाऊन एकटीच विचार करत बसते. नंतर अभ्यास....

२५/६/१९७८

प्रसन्नाच पत्र आलं. पुढच्या महिन्यात येणार आहे. हे वाचूनच माझ्या अख्ख्या देहाला गारवा मिळाल्याचा भास झाला. निदान या बातमीमुळे माझी परीक्षा नीट पार पडणार. वियोग मनाला व्याकूळ करतो. मग उगाच आठवणीत मन रमवायच, उगीचच विविध कल्पना करत मनाशीच हसायच. मनाचे हे खेळ मला कधी हवेहवेसे वाटतात कधी एकदम नकोसे. प्रेमात असच होतं का?

१७/७/१९७८

कुमुदचे पत्र वाचून आनंद झाला. नव्या संसारात रुळली तर. हे जास्त महत्वाच. सुहास-सुमी मजेत. सुमीला जवळच्या शाळेत नोकरी लागली. छान झालं. आज पाऊस सकाळ पासून थांबलाच नव्हता. घरी परतले ते चिंब भिजूनच. कदाचित म्हणूनच आजची संध्याकाळ आळसावल्यासारखी वाटत आहे. त्यात आईच्या हातचा आल्याचा चहा आणि बाबांची खास फरमाईश अर्थात भजे. प्रसन्नाची आठवण नाही झाली तर ती गार्गी कशी? अरे मानवा, माझी प्रत्येक संध्याकाळ तुझ्या आठवणीत रात्र होते. आणि तुझी? तू येणारच आहेस ना तेव्हा सगळा हिशेब मागणार.

१६/८/१९७८

आता प्रसन्नाच्या येऊन जाण्याने आठवणींत भर पडली. रोज रात्री एकेक आठवण उकलत बसणं, माझा आवडता छंदच झाला आहे. तीच पत्रं, तेच फोटो. माझ्या आयुष्यात नवे वळण केव्हा येणार कोण जाणे?

बस झाली ॲनॅटॉमी, फिजीऑलॉजी, ई.एन.टी, ॲपथॅलमॉलॉजी, नक्रॉस्कपि, हिमोसाईटालॉजी. तेच पेशंटचे विहळणे, रडणे, कधी कधी या सगळ्यातून पळून जावसं वाटतं. मी रोज किती जणांच्या दु:खावर फुंकर घालते. पेशंटला बरं कसं वाटेल याची धडपड करत असते. माझ्या मनात रोज दु:खाचे उमाळे उठतात त्याला कोण फुंकर घालणार? मी माझं दु:ख का जपून ठेवते माहिती आहे, कदाचित तो येईल आणि माझी सगळी दु:ख त्याच्या एका स्पर्शात विरुन जातील या वेड्या आशेत. माझे दु:ख ते काय माझ्या आशा-अपेक्षांचे ओझेच ना, ते उतरेपर्यन्त ते दु:खच ना. या विचारात गर्क असतांना मला काही ओळी सुचल्यात.

निष्प्राण देहावर
संवेदनेचे व्रण
उमटत नसतात
म्हणून मनातलं
दु:ख उमजत नसतं
ते नजरेनं टिपून
मोरपिशी स्पर्शात
उकलायच असतं.
उगीच दःखावर

फुंकर घालायची नसते
अश्रुंचे साठलेले दव
विरुन जातात
ते अधरांनी टिपून
सुख स्वप्नांच्या देशात
घेउन जायच असत.
म्हणून दु:ख उकलयच नसतं
ते मनात जपायच असतं
ते मनात जपायच असतं

२५/८/१९७८

याही वाढदिवसाला प्रसन्ना जवळ नव्हता. निदान माझा एक वाढदिवस तरी दोघांनी मिळून साजरा करावा असं मला मनापासून वाटत असे. माझे हे स्वप्न केव्हा पूर्ण होणार माहित नाही. गेल्या दोन वर्षात मी ट्रीपला गेलेच नव्हते. यावेळेस सगळ्यांच्या आग्रहाखातर पावसाळी सहलीला जावच लागणार. मी नाही म्हणून बघितले पण नंदू, धनू ऐकनात. सुमी-कुमुद नंतर माझा हा लाडका ग्रुप. राजनचं ऐकून फारच वाईट वाटलं. त्याचे बाबा दुसरं लग्न करुन घर सोडून गेले...

याचा राजनवर खूपच परिणाम झाला. तो हल्ली क्लासेसला दांड्या मारु लागला आहे. काल हॉस्पिटल राउंडवर भेटला नाही. राजनशी बोलायलाच हवे. शेखर, रविन्द्र, नंदू सगळ्यांनी मिळून त्याला कॅन्टीनमधे बोलावले. आमच्या राउंड टेबल कॉनफरन्स मधे तो फसलाच. त्याला कल्पनाच नव्हती आम्ही सारे मिळून त्याच्याशी या विषयावर बोलू. फ्रस्ट्रेशन किंवा डिप्रेशन मधे आधी सिगरेट मग इतर. तू कोणत्या स्टेजला आहेस? शेखरने पहिलीच गुगली टाकली. आमच्या सोबत का रहात नाहीस? त्या टारगट मुलांसोबत वेळ घालवणं वाढले आहे. प्रश्नांच्या भडिमाराने त्याने त्रस्त होउन आमच्या पुढ्यात हात टेकले. शेवटी त्याला तुझा बाप मेला अस समज आणि अभ्यासात लक्ष दे, स्पष्ट पणे सांगणारी आमची धन्नो. यामुळे रुळावरुन घसरलेल्या आमच्या मित्राची गाडी रुळावर आली इतकं नक्की.

२४/९/१९७८

सहल मस्त झाली. यात अनेक गुपीतं उघडतात म्हनूनच तर सहलीला जायला सारेच एवढे उत्सुक असतात. जो तो आपआपली जोडी घेउन फिरतो. मी पहिल्यांदाच निसर्ग एवढा जवळून बघितला. चिखलदरा इथे पावसाळ्यातच येण्यात मजा आहे. मी कधीच इतकावेळ पाण्यात भिजले नव्हते. धमाल मस्ती गाणी चिडवणे. रुटीनला हटून असं जगणं मला आवडलं. एक क्षण असे वाटले की माझ्यात भिनलेले स्पिरीट, डेटॉल सगळ्या औषधांचे वास या पाण्यात वाहून गेलेत. धबधब्यातून बाहेर निघायची इच्छाच होत नव्हती.

जानकी मॅडम, गंधे सर, कुलकर्णी सर यांनी आम्हाला धमाल करु दिली. इतर वेळेस खूप सक्तीने वागणारे प्रत्यक्षात इतके हसरे आणि फ्रेंडली असतील असे मला कधीच वाटले नाही. निदान या अनुभवानंतर मी कुलकर्णी सरांना खवीस म्हणणार नाही आणि जानकी मॅडमला निरुपा राय.

७/११/१९७८

यंदाचीही दिवाळी अशीच अभ्यासात गेली. प्रसन्नाचे पुण्यातले ट्रेनिंग पूढच्या वर्षी संपणार मग एक वर्षाचे आय.एम.एचे ट्रेनींग, मग पोस्टींग, बस अजून दोन अडीच वर्ष तग धरायची मग काय सगळं मनासारख होणार. एम.बी.बी.एस झाले की प्रसन्ना राहिल तिथे मी इंटर्नशीप करेन. आज माझं बोट कापल्या गेलं. औषध लावतांना जाणवलं (कदाचित मेडिकलला असल्याने) हल्ली शारिरिक दु:खापतीबद्दल आपल्याला काहीच वाटेनासे झाले. इतके निरनिराळे आजार आणि व्याधी जवळून बघितल्यात वेदनांमधे, लोकांना अक्षरश: पोळताना बघितले. प्रत्येकाच्या डोळ्यात जगण्याची आस बघून नवल वाटायच. कित्येकांना तर कल्पना असायची आपण एवढेच दिवस जगणार तरी जगण्याचा मोह..ओढ अनावर होतांना मी बघितला आहे. डॉक्टर काहीतरी चमत्कार करतील आणि आपण वाचू नाहीतर आयुष्य थोडं तरी वाढेल या अपेक्षा मी त्यांच्या डोळ्यात अनुभवल्या.

१५/१२/१९७८

आयुष्य कसं नेहमी सारखं सुरळीत चालले आहे. सुहासदाचा काल फोन होता जरा काळजीत वाटला. पूढच्या आठवड्यात तो आणि सुमी चेकअपसाठी येणार आहेत. मी या संदर्भात आमचे गायनिक डॉ.मधुसुदन काणे यांच्याशी बोलली. त्यांनी तपासण्या लिहून दिल्यात. बघायचं काय होते ते.

खूप दिवसात कुमुदबद्दल काही कळले नाही. हल्ली तिचे पत्र येणेही कमी झाले आहे. संसारात चांगलीच रमलेली दिसते.

१३/३/१९७९

सलग दोन महिन्यांपासून मी डायरी लिहिली नाही. खरच वेळ झाला नाही का मीच टाळत होते ठाऊक नाही.

लिहिणार तरी काय नेहमीचच रुटीन....मी या रुटीनला इतके अंगवळणी पडले होते की आयुष्यातील रटाळपणा लिहावसाच वाटला नाही. मात्र माझी डायरी मी न चुकता वाचायची. रोज प्रसन्नाचे पत्र वाचून फोटो बघून मला आठवणींच्या गावी जायला आवडायला लगले. कधी कधी आधीची गार्गी आठवली की हसायला यायचे...आधीची गार्गी आणि आताची गार्गी किती फरक आहे या दोघीं मधे. मला आता वेध लागले होते ते केव्हा एकदा मेडिकल पूर्ण करते याचे.

१८/६/१९७९

सुहासदा-सुमीची ट्रीट्मेन्ट संपली. डॉक्टर काणेंनी इतक्यात चान्स घेऊ नका म्हणून सांगितले. दोघं खूपच उदास झालीत. त्यांनी पहिलं अॅबॉर्शनचे वेळी घरच्यांना विश्वासात घ्यायला हवं होतं. कोणालाच न सांगता आटपून घेतलं त्याच वेळीस काहीतरी कॉम्पलिकेशन्स झाले आणि त्याकडे दुर्लक्ष करण्यात आलं. त्या दोघांना टेन्शन मधे बघून माझा जीवच कासावीस झाला. आत्ता पर्यन्त दोघांच्या मनासारख झालं आहे आणि पुढे होऊ देत रे देवा!

मला आता थर्डटर्मचं टेन्शन आले आहे. नाही होतेच ते सेकन्ड टर्मपासून. आता ते वाढले आहे इतकेच.

प्रत्येक स्टुडन्ट वेगळ्याच टेन्शनमधे वावरत असतो, तो सतत लायब्ररीत जात असेल तर तो नक्कीच थर्डटर्मचा विद्यार्थी आहे असे समजावे अशी आख्यायिका प्रसिध्द आहे.

१५/८/१९७९

प्रसन्नाचा एन.डी.एमधला मुक्काम वाढला. नवीन आलेल्या बॅचसोबत तो हिमाचल प्रदेशमधे ट्रेकिंग कॅम्पला जाणार आणि परत आल्यावर त्याचे आय.एम.ए,देहरादूनचे ट्रेनींग सुरु होणार.

याला पत्र पाठवायला वेळच मिळाला नाही का? असो त्याचं जुनं पत्र वाचायला काढलं. मी आज वाचते आहे ते त्याचं तिसरं पत्र. सोन्या..मन्या गार्गी, त्याने मला प्रिय वैगरे कधीच लिहिले नाही. असलंच काहीसं लिहायचा. प्रत्येक पत्रात तो आपण वर ॐ किंवा श्री लिहितो तो स्प्रिंग टर्म किंवा ऑटम टर्म लिहायचा. कारण एन.डी.ए ट्रेनींग मधे जानेवरी ते जून स्प्रिंग टर्म आणि जूलै ते डिसेंबर ऑटम टर्म असते. त्याचे पत्र पण गमती-जमतीने भरली आहेत. मी दररोज ती वाचते. ती वाचतांना असं वाटतं प्रसन्ना स्वत: ते सार सांगतो आहे आणि मी ऐकते आहे.

या पत्रात त्याने त्याच्या ब्रॅव्हो या स्क्वॉड्रन बद्दल लिहिलं आहे. इतकच काय या ब्रॅव्होच्या लोगोचा रंग पिवळा-निळा आहे हे पण लिहिलं आहे.. त्यांच्या पिकॉक-बे वर स्विमींग कॉम्पिटशन मधे तो दुसरा आला. तर ड्रील करतांना धक्का लागून दहा जण कशी पडली आणि त्यांना पडतांना बघून याने अजून धक्का दिला तर पुढचे दहा जण पडले. शिक्षा झाली तेही लिहिले. प्रत्येक पत्रात मला हसू येईल असं लिहितो. मला माहित आहे रे प्रसन्ना, तुला मी रडलेलं अजिबात आवडत नाही आणि तुझ्या आठवणीने रडलेलं तर मुळीच नाही. जिवापाड प्रेम म्हणतात ते यालाच.

२८/९/१९७९

आज एका चमत्कारी ऑनररी डॉक्टरच्या हाताखाली काम करायला मिळालं. डॉक्टर पैठनकर विलक्षण हुशार, डायग्नोसिस एकदम करेक्ट. जशी प्रत्येक डॉक्टराला मेडिकलला ऑनररी डॉक्टर होण्याची इच्छा असते तशी आम्हा स्टुडन्ट्सची या डॉक्टरच्या हाताखाली काम करण्याचे इच्छा असते. शिस्तप्रिय, गंभीर आणि गती म्हणाल तर एक साधारण डॉक्टर जर तासाला दहा पेशंटस बघतात तर हे वीस बघतात. सपाटून आणि झपाटून काम करण्याची त्यांची पध्दत. विषयाला सोडून बोलणाऱ्याला ते ग्रुपमधून काढून टाकत. त्यांच्यासोबत राहून जे शिकायला मिळतं ते अमेझिंग असतं. त्यांच्या हाताखाली काम करणाऱ्यांना देखिल कॅम्पसमधे आदराने बघत असे.

प्रसन्ना रोव्हर कॅम्पला जाणार आहे. जागेचं नाव तो सांगत नसेच. नंतर त्याला देहरादूनला जायचे आहे. म्हणजे परत पत्र पाठवू शकणार नाही.

आम्ही जरी एकमेकांच्या दूर असलो तरी हा विरह आम्हा दोघांना जवळ आणत आहे......

१५/१०/१९७९

आत्या आणि सुमी नागपूरला आलेत. आनंदाची बातमी आहे. यावेळेस आत्याने सांगितले नागपूरला जाऊन तपासण्या करायच्या. उद्या डॉक्टर काणेंना भेटावं लागेल. आज सुमीशी भरपूर गप्पा मारणार आणि डायरी उद्याच लिहिणार. इतक्या दिवसांपासून गुणगुणते आहे आज लिहूनच टाकते :

मैत्री......

कधी गुंतलेले,कधी गुंफलेले
मनामधे खोल रुतलेले
अधे मधे न उमगणारे.......मैत्रीचे नाते

कधी अव्यक्त,कधी अवास्तव
तरीही शाश्वत अन विश्वस्त
अधे मधे निशब्द...........मैत्रीचे नाते

कधी बेभान्,कधी बेधुंद
निसटलेला तोल सावरणारे
अधे मधे अलिप्त.............मैत्रीचे नाते

कधी पाण्यात, कधी आरश्यात
प्रतिबिंबासारखे अधर
दुधसागरासारखे शुभ्र........मैत्रीचे नाते

१९/११/१९७९

चार दिवस सुमी राहून गेली. सगळ्याच आठवणी आम्ही उजळत बसलो होतो. आणि ते उजळता उजळता आमचा मैत्रीचा गोफ अधिकच घट्ट झाला. सुमीला आणी मला कुमुदची इतक्यात काहीच खबरबात कळली नाही. आज ती असायला हवी होती. आठवणी म्हणजे तरी काय आयुष्याच्या नव्या वळणावर मागे वळून बघणे, काय चुकलं, काय हरवलं, काय सुटलं हा हिशेब करत ते गवसेल या आशेत पुढच्या प्रवासाला मार्गस्थ होणं.

२५/११/१९७९

खूप खूप दिवसांनी कुमुदच पत्र आलं. जरा हायसच वाटलं. मला अनाहूतच गेल्यावेळेसची माझी घालमेल आठवली. ती मजेत आहे. समिती आणि आश्रम सांभाळते. पत्रात सलीलचे कौतुक केले होते. संसार सुखी करायचा असेल तर पैसा लागतोच. मनं जुळावी लागतात. एकमेकांपाशी प्रामाणिकपणे व्यक्त होणं महत्वाचं असतं. विश्वास आपोआप दृढ होत जातो. माझे आईबाबा नाही का एकमेकांच्या मनातलं लगेच हेरतात. रुसवे-फुगवे आमच्या घरी यांना जागाच नाही.

४/१२/१९७९

प्रसन्नाचे अजून एक जूने पत्र......

"माझी मनाली, सोनाली, काय सांगू, तुझी खूप आठवण येत आहे. मी सध्या ग्रीनहॉर्न कॅम्पवर आलो आहे. आत्ता माझ्या समोर सुंदर तलाव आहे आणि त्यात दोन-तीन बदकं पोहत आहेत. भोवती दाट जंगल आहे, आणि तू माझ्या जवळ नाहीस. काल ट्रेकींग करतांना माझा यूनिफॉर्म चक्क फाटला म्हणजे कोचा पडला आणि तू शिवायला नाहीस. आज मी पहिल्यांदा इन्स्ट्रकटरची नजर चुकवून सिगारेट ओढली आणि हवेत विरणारा धूर पहायला तू नाहीस. काल मी परवा केलेल्या चूकीची शिक्षा भोगत होतो. सर्व कॅडेट्स चे उष्टे भांडे घासत होतो, पाणी टाकायला तू जवळ नाहीस...

आज,काल, आज, काय काय घडतय, म्हणून तर तुला पत्र लिहतोय...."

हा म्हणजे पत्रात काय काय लिहिल सांगताच यायचं नाही. वाचून माझ्या मनातलं मळभ दूर होऊन जातं इतकं नक्की. हे पत्रच तर माझं जगणं सुसह्य करतात.

१५/१२/१९७९

आज कॉलेजमधे दिवस हेक्टीक गेला. आम्हाला एकूण दहा डिलीवरीज़ काराव्या लागतात त्यापैकी एकाची संपूर्ण माहिती सगळ्या तपशीलासह, पेशंटचे नाव, वय, तारीख, बाळाचे डिटेल्स- त्याचे वजन इत्यादी इत्यादी. आज माझा त्याच्यात संपूर्ण दिवस गेला. लेबर रुममधे आज तब्बल नऊ डिलीवरीज़ होत्या. नुसतीच धावपळ त्यात दोन सिस्टर आजारी असल्याने आल्याच नव्हत्या. माझी एकच केस होती. परिस्थिती बघून मला मदतीला जावेच लागले. दिप्ती,शशि मला मदत करायचे. आता माझी टर्न. तिसरी टर्म सुरु झाली रे झाली नोट्स काय अगदी गरज पडली तर ॲप्रनची देखिल अदला बदलं होते. हो कुठल्या डिपार्ट्मेन्ट मधे स्वच्छच ॲप्रन घालावा लागतो खास करुन पॅथलॉजीला.

प्रसन्नाचा फोटो आज चुकून पुस्तकात राहून गेला. कोणाला दिसला नाही म्हणून बरं. माझ्या मेडिकलच्या मैत्रीणींनी बघितलं तर सगळ्याच फिदा होतील याच्यावर.

१०/१/१९८०

प्रसन्ना कॅम्पवरुन पुण्याला आला आणि देहरादूनला ट्रेनींगसाठी गेला. फोनवर एवढच बोलला. सविस्तर पत्र लवकर पाठवतो म्हणाला. म्हणजे हा नक्की कॅम्पच्या गमती जमती लिहून पाठवणार.

ट्रेकिंग प्रसन्नाला खूप आवडतं आणि त्यात तो एक्सपर्ट आहे. त्याचे माथेरान, नाशिक आणि पुण्याभोवतीचे  सगळेच डोंगर चढून झालेत. तो स्विमींग चॅम्पिअन आहे. मला दोन्ही येत नाही. खूप उंचावरुन खाली बघितलं तरी मला गरगरतं. प्रसन्ना डेअर डेवील. मला मात्र असल्या अॅडवेन्चर्सची भिती वाटते. कोण म्हणतं एकसारखं विचार करणाऱ्यांची मनं जुळतात वैगरे. स्वभावाने, सवयीने, विचाराने आम्ही दोन टोकं. तो माणूसवेडा, मी आपल्यातच रमणारी. त्याला भरपूर मित्र मैत्रिणी. माझ्या दोनचार. तो शिस्तप्रिय, थोडक्यात घड्याळकाका. रोज त्याच वेळेवर उठणं, झोपणं. मला सकाळची झोप अत्यंत प्रिय. रविवारी मी आठ-नऊ वाजल्याशिवाय उठत नाही. तो निसर्गात रमणारा, जंगलात, डोंगरात भटकणारा. माझा निसर्ग मी माझ्या खिडकीतून बघते रात्रीचा चंद्र आणि चांदण्या. आजवर शाळा-कॉलेजमधे ज्या सहलींना गेली तेवढाच. त्याची रहणी टापटीप. एकदम आर्मीछाप. मला नटण्यामुरडण्याची हौसच नाही. कपड्यांबद्दल तो नेहमीच चूझी आणि परफेक्ट मॅचींग. मी आईने आणलेले कपडे कुठलीच तक्रार न करता घालणारी. माझं वाचनात लक्ष. त्याला वाचन फार नाही आवडत. मी एकांतप्रिय, त्याला गोंधळ, दंगा, मस्ती आवडते. आणि आमचं एकमेकांवर प्रेम जीवापाड प्रेम आहे. आहे ना हे गुलाबी कोडं. कसं काय माहित नाही पण आहे खरं.

२६/२/१९८०

आज बाबांची तब्येत ठीक नाही. त्यांना कसचे तरी टेन्शन आहे असं मला दोन दिवसापासून वाटतं आहे.

ते तर काही सांगणार नाही. उद्या वर्धेला जाणार म्हणतात. नक्की काय ते विचारायला पाहिजे.

राजन आणि नंदूचे एम.बी.बी.एस झाले. दोघं किती आनंदात होती. इंटर्नशीपसाठी प्रयत्न करत आहेत.

आणि साईड बाय साईड डॉक्टर पैठनकर यांच्या क्लिनीकवर जाणार. त्यांचे निदान आर्थिक प्रश्न सुटणार होते. धनश्रीचे तीन विषय राहिले. येत्या परिक्षेत काढेल म्हणाली तर आहे.

४/३/१९८०

वर्धेवरुन आल्यापासून बाबा काळजीत वाटले. वर्धेला भाडेकरुंनी तीन महिन्याचं भाडं बँकेत जमा केलं नव्हतं. मी सरळ त्यांना काढून टाका म्हटलं तर ते किती चिडलेत. भांडारकर काका आमचे भाडेकरु त्यांची फॅक्टरी बंद पडल्यामुळे त्यांना भाडं भरता आलं नाही. बाबांनी त्यांच्या नोकरीसाठी ओळखीच्या लोकांकडे शब्द टाकला होता. माझे बाबा वरुन म्हणतात कसे त्यांना बेघर करण्याच दुष्कर्म मी करणार नाही. त्यांच्या बायकोने घरी मेस सुरु केली आहे. त्यांच्या नोकरीच जमेल. देतील पैसे सावकाश. ही वेळ सावरण्याची आहे मैना. सावरायचं की मोडायचं हे आपल्या हाती असतं. आणि आपण जे करतो त्यावरुन आपल्यात किती माणुसकी आहे हे सिध्द होतं.

जर मी त्यांना घर सोडायला सांगितलं असतं तर कदाचित त्यांचे हे दिवस कसेबसे निभले असते. पण माझ्या मनात जन्मभरासाठी शल्य राहून गेले असते. पैसा म्हणशील तर आपल्याजवळ आपल्यापूरता आहे ना. एक लक्षात ठेव आयुष्यात मनात जन्मभरासाठी शल्य बोचत राहिल असं काही करु नकोसं.

आज माझ्या बाबांसाठी माझा आदर खूप वाढला.

१५/४/१९८०

बस काही महिन्यात प्रसन्नाचे आय.एम.एचे ट्रेनींग संपणार नंतर पोस्टींग. तो पर्यन्त माझे एम.बी.बि.एस पूर्ण होणार आणि आमच्या दोघांच स्वप्न. या कल्पनेने आनंद झाला खरा. मनात एक हूरहूर दाटून आली. प्रत्येक दिवस प्रत्येक रात्र हाच विचार करायची. रोज रात्री मी, डायरी.,पत्र आणि निशब्द एकांत. अशा एकांतात स्वत:शीच संवाद चालायचा आणि नकळत ओळी सुचायच्या. मी प्रसन्नाला पत्रात लिहून पाठवायची. या आठवणींची सोबत नसती तर?

आज चार ओळी ओठावर घुटमळून गेल्या.

सांकव

एका कातरवेळी..मी अन माझे एकटेपण
खूप दूरवर चालत आले, लागला
एक अपरिचित सांकव...पार करु कि नको
या घालमेलीत केव्हा तरी पार केला
आठवणी..जीवघेण्या अन निशब्द
माझ्यापुढ्यात येऊन उभ्या
हातात हात घालून त्याही चालू लागल्या
काहि कडु काहि गोड
भुतकाळ हळूहळु सरकत होता
सगळ्या आठवणी हातपाय पसरुन बसल्या
चांगलाच रंगला होता आमचा संवाद

तेवढ्यात आली काळोखाचे एक तिरिप
आणि आठवणींचा हात माझ्या हातून सुटला
मी घाबरले...पण.जाता जाता कळत नकळत
माझ्या मुठीत हव्यहव्याशा आठवणी
राहून गेल्या ...आताशा मी रोज येते या सांकवावर
कातरवेळी ,मुठभर आठवणी घेऊन.

१७/५/१९८०

आज वर्धेवरुन भांडारकर काकांचा फोन आला. त्यांना एका कंपनीत नोकरी लागली. भाडं जमेल तसं देईन, म्हणतांना त्यांचा आवाज कापरा झाला. सारखं तुमचे उपकार जन्मभर विसरणार नाही म्हणत होते. माझे बाबा ग्रेट आहेत. त्यांचा आजपर्यन्त कुठलाच निर्णय चुकला नाही.

२७/६/१९८०

आज कुमुदचा फोन आला. सहसा ती फोन करत नाही. आवाजात विलक्षण भिती होती. सलीलच्या वर्कशॉपला शॉर्ट सर्किट होउन आग लागली. बरच नुकसान झालं. या आगीत सलील गंभीर जखमी झाला. मी एकून सर्द झाले. अंग थरथरायला लागलं. कुमुदचा केवीलवाणी चेहरा सारखा डोळ्यापुढे येत होता. पहाटेच वर्धेसाठी निघायचं.

७/७/१९८०

कुमुद उध्वस्त झाली होती. सलील सत्तर टक्के भाजला होता. वाचणं तसं कठीणच दिसत होतं. एकतर पोलीस केस त्यातून परिस्थिती त्याला नागपूरला हालवण्यासारखी मुळीच नव्हती. दोन दिवस वाट बघून त्याला नागपूरला आणले. मेडिकलमधे बर्न वार्डात मला असं यावं लागेल याची स्वप्नात कल्पना केली नव्हती. कुमुद थिजून गेली. नशिबाने दुसरा डाव उधळून लावला होता. तिला सावरायचं तरी कसं? निरंजन दादा सुन्न होता, गुंदेचा कुटुंब कोसळून गेले. अनेकांना आधार देणाऱ्यांचा आधार आज निराधार झाला. सलील शुध्दीवर आला, त्याचं जीवघेणं कण्हणं माझा जीव कासावीस करत होतं. मलाच आधाराची गरज भासली. मी त्याच्या वेदना कमी करु शकले नाही ही खंत मनाला बोचत रहाणार. सलीलच्या डोळ्यात मुक्तीची आस दिसली. त्याला मृत्यूची चाहूल लागली होती. कुमुदला कापत्या आवाजात म्हणाला, माझी तुझी साथ इतकीच. माझ्यानंतर सर्वांना सावरशील ना? थिजलेली कुमुद मला मिठी मारुन रडत होती. तुझ्या पोटात वाढणाऱ्या आपल्या बाळासाठी. मी आणि आई हे एकून गांगरुन गेलो. सलीलने प्राण सोडला आणि सारेच कोसळले.

दोन्ही वेळेस ती उध्वस्त होतांना मी साक्षीदार होते. यालाच प्राक्तन म्हणतात का? माझ्या निष्पाप मैत्रीणीच्या भाळी काय लिहिलं आहे? एका क्षणात माझा ईश्वर, निष्ठा, श्रद्धा, यावरून विश्वासच उडाला. माझ्यातच बळ नाही मी तिला कशी सावरणार. आईबाबा, निरंजन दादा, गुंदेचा कुटुंब आम्ही पुढच्या विधीसाठी वर्धेला रवाना झालो. मी तिला माझ्यासोबत नागपूरला चलण्यास आग्रह केला ती तयार नाही झाली. आता ती एकटी नव्हती, दोन जिवांची होती. जड अंत:करणानी मी कुमुदला सोडून नागपूरला आले.

वर्धेहून आल्यापासून कशातच लक्षं लागत नाही. सारखा तिचा चेहरा डोळ्यापूढे येतो.

१७/८/१९८०

निरंजन दादाचा फोन आला. कुमुद थोडीफार सावरली. तिने सासरी रहाण्याचा निर्णय घेतला. मला तिचे वाक्य आठवले. दुसरा डाव मांडून बघते. बघू नियतीला काय मंजूर ते. किती क्रुर आहे नियती. संसारसुख दिलं पण किती? जेमतेम तीन वर्षांच. सुमी तिला भेटून आली. मला आत्याकडून परवाच सुमी आता दोन जीवांची झाल्याचं कळलं. ती नागपूरला डॉक्टरांना दाखवायला येणारच आहे. माझं काय प्राक्तन आहे? माझ्या दोन्ही मैत्रिणी दोन जीवांच्या एक सुखात तर दुसरी दु:खात.

२५/८/१९८०

सुमीच्या सर्व तपासण्या झाल्यात. डॉक्टर कार्णेनी खूप काळजी घ्यायला सांगितली. सुमीला सुखाची चाहूल लागली असली तरी ती ते व्यक्त करु शकत नव्हती. आजवर आम्ही तिघींनी आयुष्यातली प्रत्येक गोष्ट शेअर केली. एकमेकींना समजून घेतलं. वेळप्रसंगी आधार दिला. सुख-दु:ख शेअर केली. पण आजचा क्षण काय विचित्र आहे आम्ही ना दु:ख व्यक्त करु शकतो ना सुख.

नेहमी भेटल्यावर सतत बडबड करणाऱ्या आम्ही आज निशब्द झालो.

सुमीची डिलीवरी वर्धेलाच करणार असं ठरलं.

२/९/१९८०

प्रसन्नाचं मला लांबलचक पत्र आलं. मी स्वत:ला सावरले. तो मात्र माझी काळजी करत होता. त्याचं हे सेन्टीमेन्टल पत्र वाचून आधीची पत्र त्यानी पाठवलीत असं कोणीही म्हणणार नाही. किती समजुतदार आहे हा. मला त्यांच्या पाठीशी उभी रहा सांगणारा हा माझ्या भावना माझं मनं किती जपतो. आम्ही परस्परात इतके गुंतलो आहे एक उदास झाला तर त्याची चाहूल दुसऱ्याला आपसुक लागते.

१४/१०/१९८०

माझ्या खोलीतल्या खिडकीत जुन्या कुंडीत एका निळ्या करड्या चिमणीनं घरटं तयार केलेलं दिसलं. मी तिला माझी डायरी आणि आठवणी रोज सांगायची. दिवसभर ती हिंडायची संध्याकाळी परत घरट्यात, अगदी विन्दांच्या निळ्या पक्ष्यासारखी.

परीक्षा जवळ आली. अभ्यासाचा हल्ली ताण पडतो आहे. मन अस्थिर असेल तर कशातच लक्ष लागत नाही. आजवर मी माझ्या विचारांचा आणि मनातील भावनांच्या चढउताराचा अभ्यासावर परिणाम होऊ दिला नाही. ते मळभ तात्पुरते बाजूला ठेवून मी अभ्यास करायची. आठवणींच मळभ परत दाटून आलं. अनेक विचारांचे तरंग मनाच्या तळ्यात उठले. विचित्र मनस्थितीत मी गुंतत गेले, विचारांचा हा गुंता सोडवायचा होता. यात दंग असतांना माझे मन कधी पक्षी होऊन गेलं कळलेच नाही.

काही केल्या, काही केल्या
निळा पक्षी जात नाही
प्रकाशाचे पंख सान
निळी चोच, निळी मान
निळे डोळे, निळे गान
निळी चाल, निळा ढंग
त्याने चढे आकाशाला
निळा रंग.

विचारांना झटकण्याचा प्रयत्न विन्दांसारखा मी करून पाहिला पण तो निष्फळ ठरला.

हा पक्षी जणु माझ्या अंतर्मनातील द्वंद्वाचे प्रतीकच, जो विचार बुद्दी झटकून टाकण्याचा प्रयत्न करते, मन त्याचा तेवढाच विचार करायला लावते. माझे आयुष्य इतरांसारखेच तरी कुठेतरी मी हरवले होते.

पुन्हा तोच निळा पक्षी आला. आता मी एकटेपणाची आणि त्या चिमणीची वाट पाहू लागले. आज या विचारांची गर्तता गहन होती.

"असली ही जात न्यारी,
बसे माझ्या निंबावरी;
पृथ्वीमध्ये पाळे खोल;
तरी सुध्दा जाई तोल....अनंताचा खड्डा खोल"

विचारांच्या खोल गर्ततेत हा अनुभव प्रत्येकाच मन घेत असेलं, विन्दांना या ओळीतून नेमक काय सुचवायच होतं? मनावरचा ताबा आधी ढळतो, की विचारांवरचा? इतके वर्ष मी काय केलं? मी, माझा अभ्यास, माझे ध्येय जपण्यातच गुंग होते. तोच माझा छंद तोच माझा नाद. मला आयुष्यात एवढच साधायच होत? याच इच्छा, याच आकांक्षा होत्या. माझं खरं समाधान यातच होतं तर एवढ सगळ साधतांना मला कशाची हुरहुर लागली आहे? एवढे प्रश्न स्वत:ला विचारुन माझा मन आणि विचार या दोघांवरचा सयंम सुटला होता. ध्येय साधता साधता प्रसन्नाशी मी प्रतारणा तर करत नव्हते ना?

"मी सर्वसामान्य, माझं आयुष्य सर्वसामान्य, सार काही सुरळीत चालू असतांना मन अस्थिर का? हा धागा काही केल्या सापडत न्हवता. मी या वर जेवढा विचार करायची तेवढी अस्वस्थता वाढत होती."

तर्काच्या या गोफणीने, फेकितसे काही जड ;
आणि पाने आघाताने करतात तडफड;

टिकाळीला निळा पक्षी, जसा धड तसा धड
... ...उंच जागा अवघड.

विन्दांप्रमाणेच माझी विचार शक्ती आज मनाच्या अधीन झाली होती. कसली ही तगमग, अतृप्ततेची बोच का म्हणून मला छळत होती काहीच कळत नव्हते. खरंच ही जागा उंच आणि अवघड होती. अंतर्मनाचा आवाज बुध्दीपर्यंत पोहचवण्याचा माझा मीच प्रयत्न करायलाच हवा. गोफणीने वार करायलाच हवा. मी या द्विधा मनस्थितीतून बाहेर पडायलाच हवे.

याचे गान याचे गान,अमृताची जणू सुई
पांघरुण घेतो जाड,तरी टोचे,झोप नाही
जागविते मेलेल्याला ,जागृतांना करे घाई
याचे गान याचे गान,स्वरालाच नुरे भान
नाही तार नाही मंद्र ,चोची मधे धरी चंद्र
काही केल्या निळा पक्षी जात नाही

या मनस्थितीत, या परिस्थितीत मला गोफणी ने नेम साधता येइल का? प्रयत्न तर करायलाच हवा.

२८/१०/१९८०

चौदा तारखेचं पानं मी परत परत वाचलं मी अगतिक होईल कधीच वाटले नव्हते. मनं जरा हलकं झालं. जेव्हा बुध्दी आणि मनं विचार करुन थकून जात असतीलं, व्यक्त होण्याचे सारे मार्ग बंद असतीलं अशा वेळीस अशीच प्रतिक्रिया उमटत असावी. या सगळ्या जाणीवा बाजूला ठेवून मी मन घट्ट केलं, माझं ध्येय समोर आणलं आणि ते पूर्ण करण्याचा संकल्प केला.

थोडक्यात आधीची आणि आत्ताची गार्गीत नवा बदलं जोडला गेला.

>..........<

नचिकेत वाचून सुन्न झाला. तो गार्गीबद्दल विचार करु लागला. काय विलक्षण बाई आहे ही. माझ्रा आणि हिचा काय सबंध. गार्गी देवदत्त खानोलकर. त्याने नाव आठवायचा प्रयत्न केला पण काहीच आठवेना. कुमुद नाव आईच्या तोंडून एकल्याचे त्याला पुसटसे आठवत होते. निरंजन हे नाव ऐकल्यासारखे वाटले. डॉक्टर गार्गी हे व्यक्तिमत्व म्हणजे स्थिर वृत्ती, स्थिर प्रवृत्ती, जबरदस्त विचार क्षमता, कार्यक्षमता, आयुष्याकडे पहाण्याचा सकारात्मक दृष्टीकोन, स्वत:तले बदल टिपणारी एक परफेक्ट ह्यूमन बींग.

अनुला यायला वेळ आहे. "तासाभरात येते" तिचा मॅसेज त्याने वाचला. त्याला अनुचेच आश्चर्य वाटले. हे सारं वाचल्यावर ती इतकी कशी नॉर्मल राहू शकते. नचिकेत उगाच डायरीतल्या पात्रांमधे अनु कोणासारखी शोधू लागला. माझी अनु वेगळीच. समंजस, सोज्वळ थोडी गार्गीसारखी थोडी सुमीसारखी. नचिकेतला अपल्या विचारांच हसू आलं.

तेवढ्यात त्याला आजीने चहासाठी आवाज दिला. आजीला विचारु का? ती यापैकी कोणाला तरी नक्कीच ओळखत असणार. नचिकेतच्या मनात आले.

का रे नचि बरं वाटतं का? औषध घेतलं का? गरम काही खायला करुन देऊ का? आजीच्या प्रश्नांवरुन त्याला आपण सीक लीव्हवर असल्याचे लक्षात आले.

या डायरीच्या कथानकात तो इतका गुंतला की आज आपण  सुट्टीवर आहो हे विसरुन

गेला. दुपार केव्हा झाली हे कळलचं नाही. पेपर वाचायचा राहून गेला. "बाप रे" भानावर येत त्याने चहा संपवला आणि परत पळत खोलीत आला. डायरी काढली. जुने फोटो परत एकदा बघितले. त्याला संदर्भ लागला नाही.

१७/११/१९८०

प्रसन्नाचं ट्रेनींग संपत आलं. त्याची पासिंग आऊट परेडची तयारी सुरु आहे. तो आल्यावर सगळे प्लॅन करता येतील. आज हॉस्पिटलचा राउंड घेतांना जनरल वार्डातील एकोणीस नंबर बेडवरती आजी रडतांना दिसल्यात. त्यांना दोन तीन दिवसात डिस्चार्ज मिळणार. ठणठणीत बऱ्या झाल्यात तरी रडत होत्या. मी मेले असते तर लेकरांनी आनंदात स्मशानात नेली असती. बरी झाले आता कुठे जाऊ? मी एकून गारच झाले. सिस्टरने सांगितले आजारपणाचा खर्चासाठी बँकेचे कागदपत्र आहेत, म्हणून यांनी मुलांनी दिलेल्या पेपर्सवर सह्या केल्या. कालपासून कोणी भेटायला आले नाही. डिस्चार्ज मिळाल्यावर कुठे जाणार म्हणून केव्हाच्या रडत आहेत. स्टाफला त्यांच्या घरच्यांना कॉन्टॅक्ट करायला सांगितलं आहे. मी डॉ. कदमांना भेटायला गेले.

मी अशा प्रसंगाला पहिल्यांदाच सामोरे जात आहे बघून डॉ. कदमांनी असं बऱ्याच केसमधे होतं सांगताच, “आता पुढे काय?” माझ्या चेहऱ्यावरचे भाव बघून, त्यांनी बघतो असं आश्वासनं दिलं

८/१२/१९८०

बेड नंबर एकोणीस या विषयावर आमच्या ग्रुपने बरीच चर्चा केली. तेव्हा असली पहिली केस नाही अशाच प्रकारच्या भरपूर केसेस इथे होतात. त्यांच पुढे काय होतं? यासाठी मेडिकल जवाबदार नाही. मेडिकलची ड्यूटी, पेशंटला बरं करणं. मग अशा लोकांची जवाबदारी घेणार कोण?

यावर आम्ही ऐन परिक्षेच्या दिवसात सर्व्हे करायचा ठरवला. प्रत्येक डिपार्टमेन्ट मधे जाऊन अशा केसेसची माहिती मिळावायची. ठरलं. पण क्रायटेरिया काय? गरजू? ज्येष्ठ नागरिक? महिला? लहान मुलं? आणि आत्तापर्यन्त तर किती पेशंटस असतील. शेवटी या वर्षातील सगळ्या डिपार्टमेन्टमधून आधी अशा केसेस गोळा करायच्या, असं ठरलं.

१५/१२/१९८०

ओरल्स, प्रॅक्टिकल्स आणि सर्व्हे यात मी गुंतले होते. हळूहळू आमचा ग्रुप मोठा झाला. आम्ही बारा जणं होतो आत चाळीस झालोत. ज्या ज्या डिपार्टमेन्टला आम्ही जायचो याबद्दल ऐकून तो ग्रुपमधे सामील होत गेला. आम्ही माहिती गोळा करत होतो, पण पुढे काय? आपण कुठल्या प्रकारे त्यांना मदत करु शकतो? यावर चर्चा करायला आम्ही आज कॅन्टीन मधे जमलो. बरेच सजेशन्स मिळालेत. पण समजा लहान मुलगा असेल. तर त्याला अनाथाआश्रमात सोडायचं. महिला असेल तर तिला रोजगार मिळवून द्यायचा. ज्येष्ठ असतील तर त्यांना वृध्दाश्रमात पाठवायचं. पण हे सार करायचं कोणी? आपण आहोत तोवर आपण जातीने लक्ष देउन करु. आपल्यानंतर? याला एक परमनंट सोल्यूशन हवं. एखाद्या वर्षाचा उपक्रम म्हणून नको.

सिस्टर बेला आमच्या या सर्व्हेला खूप दिवसांपासून न्याहळत होती. आम्ही तिला मिटींगमधे बोलावलं.

तिच्या बहिणीला तिसरी मुलगी झाली आणि दवाखाण्यातून तिला आता घरी येऊ नको असं नवरा म्हणल्यावर बेलानी तिला आधर दिला. मेडिकलच्या कॅन्टीनमधे ती सध्या पोळ्या करते. तिला अश्या लोकांना मदत करायची ईच्छा होती. राजनने एक वही आणली. त्यात या उपक्रमातील सदस्यांची यादी तयार केली.कोण?कशी? मदत करु इच्छितात ते त्यांच्या नावापुढे लिहिण्यात आले. त्यानूसार केसेसचे वाटप करण्यात आले. आधी जुन्या मग नवीन केसेसला प्राधान्य देण्यात आले. सदस्य फी प्रत्येकी दहा रुपये महिना आकारण्यात आली.

१८/१२/१९८०

सदस्यांची फी आणि हिशेब शेखर आणि नरेन्द्र सांभाळत होते. मग माझ्या बाबांच्या आग्रहाखातर बँकेत खाते उघडण्यात आले. खाते उघडायच्या अनुषंगाने सोसायटीचे रजिश्ट्रेशन करायचे ठरले. मेडिकल मॅनेजमेन्ट यासाठी परवानगी देईनात.

आम्ही आमच्या कॅम्पसमधले दयाळू-मायाळू डॉक्टरांना गाठलं.

२७/१२/१९८०

आमच्या या उपक्रमाला चांगलाच प्रतिसाद मिळत गेला. डॉक्टर पैठनकरांनी मध्यस्थी केली आणि आमची सोसायटी मिशन यशस्वी झालें. सर्वानुमते या सोसायटीचे नाव "हेल्पिंग हँड" सोसायटी ठेवण्यात आले. कमिटी तयार झाली. डेटा कलेक्शनसाठी मेडिकलचा स्टाफ पुढे आला. डॉक्टर्स, सिस्टर्स, वॉर्डबॉय सगळेच या मिशनमधे सामील झालेत. आज हेल्पिंग हँडच्या लोगोचे पण औपचारिक उदघाटन झाले. पॅथलॉजी डिपार्टमेन्टच्या लॅबच्या दोन स्टोअररुममधली रिकामी रुम आम्हाला आमच्या उपक्रमासाठी मिळाली. फिजिऑलॉजीताल दोन रॅक्स , कॅन्टीनमधला जुना टेबल आणि कॉलेज स्टाफरुम मधून चार खूर्च्या मिळाल्यात असे आमचे अनेकांच्या हेल्पिंग हॅन्डमुळे " हेल्पिंग हॅन्ड" चे ऑफिस सुरु झाले. माझ्या एका विचाराचा असा मदतीचा वृक्ष तयार होईल मी कधी कल्पनाच केली नाही. आईबाबांच्या डोळ्यात कौतुक बघून मला समाधान मिळालं. कॉलेजमधे मला आता सारेच ओळखू लागले.

डॉक्टर पैठनकरांनी मला त्यांच्या क्लिनीकवर बोलवलं. मी आणि बाबा गेलो. त्यांनी माझं खूप कौतूक केलं. आणि इंटर्नशीपसाठी विचारले. त्यांच पुण्यात हॉस्पिटलचं काम जवळ जवळ पूर्ण होत आले होते. त्यांना वाटलं पुणे म्हंटल्यावर मी जाणार का नाही. इथल्या डीनशी मी बोलतो. तू काळजी करु नको. माझ्या आनंदाला उधाण आलं. प्रसन्नाजवळ जाण्याचा थेट मार्ग मला मिळाला.

माझा विश्वास बसत नव्हता.

१०/१/१९८१

प्रसन्नाला पुण्याचं पोस्टींग मिळालं. अर्थात ही जादू त्याच्या बाबांनी केली. त्याला दुसरीकडेच मिळणार होतं. अर्चनाआत्याला बरं नव्हत. बाबांच्या  पायाचं ऑपरेशन करायचं होतं. आधी पुण्यात ये, लग्न कर, नंतर दोघं कुठेही रहा. सध्या घरी यायला उशीर होतो. सगळं आटपून एच.एचचं (हेल्पिंगहॅन्ड) काम बघावं लागतं. माझ्या खिडकीतली चिमणी पिलांसकट उडून गेली होती. घरटं बरेच दिवस तसच पडून होतं. मी रितं घरटं बघत आठवणीत रमते.

परांजपे शाळेनी दोन मुलांना दत्तक घेऊन त्यांच्या शिक्षणाची आणि रहाण्याचे सोय केली. बेडनंबर एकोणीसच्या आजी, सुमन कापसे यांना वृध्दाश्रमात पाठवलं. चालू महिन्याचा खर्च एच.एच.ने केला. मात्र पुढचा खर्च त्यांच्या मुलांनी करायचा कबूल केलं.  आमची संस्था हळू हळू स्थिर होतं आहे. नवे सदस्य, नवे विचार रुजतात आहे. एकंदरीत एच.एच.चा उद्येश्य सफलं झाल्याचा मला खूप आनंद झाला. या संस्थेच्या व्यापात मी इतके गुंतले की माझ्या भोवती मीच रचलेले आठवणींचे आणि एकाकीपणाचे वलय आता विरायला लागलं आहे.

१०/२/१९८१

सुमीचं पत्र आलं. ती दोन दिवसांपूर्वीच बाळंतपणासाठी वर्धेला आली. कुमुद बरी आहे. पूर्वीची कुमुद हरवून गेली. ती जगते आहे ते फक्त तिच्या बाळासाठी. तिच्या सासू-सासऱ्यांनी मुलाच्या मृत्यूला कुमुदला जवाबदार ठरवलं. जे लोकं आपण चांगली म्हणत होतो त्यांचे रंग आता दिसायला लागलेत. आश्रमात आणि तिथल्या मुलांमधे ती खूप गुंतली आहे. पठ्ठी ऐकत नव्हती. निरंजन दादा तिला बळजबरीने माहेरी घेऊन आला. ती डिलेवरीसाठी नागपूरला येणार होती. आता माझ्याच दवाखाण्यात नाव नोंदवले आहे. तिच्यासाठी मी माझे डोहाळजेवण रद्द केले. त्यामुळे तू आता डिलीवरीच्या तेव्हाच ये. गार्गी नक्की ये मला फार भिती वाटते आहे. सुहासचं टेन्शन डिलेवरी होईपर्यन्त जाणार नाही. सुमीचा निरोप मिळाला.

मला एप्रिल महिन्यात दोघींसाठी जावं लागणार.

१५/२/१९८१

एच.एच.चे काम छान सुरु आहे....प्रसन्नाच्या आईबाबांच पत्र आलं. त्यांना माझा हा उपक्रम खूप आवडला. अर्चना आत्या तर सोशल वर्कर आहे तिने माझं कौतुक केलं. यामुळे आईबाबा आनंदात आहे. त्यांचा आनंद आणि समाधान माझं. बाबांनी माझ्या इंटर्नशीप बद्दल सांगितले. अर्चना आत्या पुण्यात माझी रहायची सोय करते म्हणाली. आता ती आमची लेक आहे, यावर माझ्या आईबाबांचे डोळे पाणावले. लग्नाच्या गोष्टी सुरु झाल्यात. पूढच्या महिन्यात प्रसन्ना आईबाबांसोबत येणार आहे.

माझे स्वप्न पूर्ण होणार. मनात इतके दिवस जपून ठेवलेली हूरहूर मी चारी दिशांना उधळून टाकणार. आनंदात मी प्रसन्नाचे पत्र वाचायला घेतले.

"माझी गोंडस,लोभस मैना, तुझ्या आठवणीनं माझी झाली दैना, केव्हा भेटशील सोचें दिन और रैना का घेतलंस माझ्या मनीचं चैना, दोनो घुमने जायेंगे चाईना "काय जमली ना मला कविता. तुझ्या कवितांचा असर.... बापरे! ही याची कविता. तू भेटच दाखवते तुला !! तुला शिकविन चांगलाच धडा. ती फुलराणी मधला संवाद उगाच आठवून गेला.

सगळच कसं व्यवस्थित चाललं आहे. मी उगाच धास्ती घेत होते, माझं मलाच वाटलं. नंदूच लग्न ठरलं. धन्नोचा प्रेमविवाह कॉलेज मधे चर्चेचा विषय झाला. धीरज केशवानी म्हणून मुलगा होता दोघांपैकी कोणाच्याच घरचे तयार झाले नाही सरळ लग्न करुन मोकळी.

१०/३/१९८१

प्रसन्ना आला. कित्ती दिवसांनी आम्ही भेटलो. अंबाझरीच्या तलावावर. खूप गप्पा, खूप गोष्टी. मन वाऱ्यासारखे उधाण झाले. चार दिवस आम्ही सोबत घालवले. कोणाच्याच चिडवण्याची टोमण्यांची पर्वा न करता आम्ही दोघं मस्त फिरलो. तेलंखेडीला तर तिथल्या मारोतीच्या पायथ्याशीच दोन तास बसलो.

या खेपेस त्याने आय.एम.ए मधल्या कुठल्याच गोष्टी सांगितल्या नाही मला जरा आश्चर्यच वाटलं. प्रसन्ना निघायचा दिवस आला. मला म्हणे चिंगी रडू नकोस. मी सांगत होतो ना, दोघांचं स्वप्न दोघांनी मिळून पूर्ण करायचं. झालं, थोडीशी कळ सोस. मग आपलं आयुष्य इंद्रधनुसारखं सप्तरंगाचं होईल. त्याने जातांना मला दोन पत्र दिलेत. इतक्यात नको वाचू. माझं पत्र आलं नाही तर वाच. मला एक क्षण सुचलं नाही. तो थोडा उदास दिसला मला वाटलं माझ्या वियोगाने होणाऱ्या दु:खामुळे असावा. मी काही विचारायच्या आत त्याने मला ए तुझी एखादी कविता दे ना. त्याची "ऐ "म्हणायची लकब मला आवडायची. लग्नाची तारीख पुढच्या भेटीत काढू. मी जोर दिल्यावर परीक्षा आटोपल्यावरचा पहिला मुहुर्त ठरला. मला माझ्या तपाच फळ मिळाल्यासारखं वाटलं. आज माझा आनंद कुठेच मावत नव्हता.

इतकं बोललो तरी मन भरत नव्हतं आणि रितंही होत नव्हतं. थोडक्यात एकमेकांना सोडून रहाणं आता जड वाटत आहे. बळे बळेच आम्ही एकमेकांचा निरोप घेतला.

.आणि माझ्या तृप्त मनातून सहज स्फुरलेल्या या ओळी.

शब्दांनी यावे
जसे पावसाचे थेंब
भाव साकारावा

जसा इंद्रधनचे रंग
अर्थ एकरुप जशी
भिजे धरा चिंब
श्वासात खोल घ्यावा
शब्द मृदगंध
या गंधात मन
होईल बेधुंद
या धुंदीत गावे
प्रीतीचे गीत.

२/४/१९८१

प्रसन्ना नेहमीच जातांना जीवाला हूरहूर लावून जातो. परत आठवणींचा ताफा माझ्या दिशेनी येऊ लागला.

का दरवेळेस एकमेकांच्या सहवासातील क्षणं माझ्या कडे आशेने बघतात? मी स्वत:ला वेगळ्या विषयांकडे वळवण्याचे सारे प्रयत्न विफल झालेत. आठवणींचा निळा पक्षी माझ्याकडे झेपावलाच. माझी डायरी, आठवणी आणि फोटो मी बऱ्याच दिवसांनी या खिडकीत आले. त्या चिमणीचं घरटं, जोराचा वारा आला आणि पडलं पण काही काटक्या तशाच होत्या. माझंही तसच आहे ना?

पुढच्या आठवड्यात वर्धेला जायचं आहे. सोबत आईपण येणार आहे.

सुमी-कुमुद, दोघींची सुखरुप डिलीवरी झाली पाहिजे.

७/४/१९८१

हॉस्पिटलमधे आज गदारोळ झाला. जनरल वार्डातील बेडनंबर एकवीसच्या पेशंट रघुवीर ने आत्महत्या केली. जेमतेम तिशीचा असेल. आजारपणाला कंटाळून त्याने आत्महत्या केली. खरच त्या वेदना आम्हालाच बघवत नव्हत्या. कॅन्सरने तो तसाही मरणारच होता. त्याने वेळ येण्याआधीच माघार घेतली.

"त्याला आपल्या आईवडिलांचं दु:ख बघवत नव्हतं. त्यांचे पैसे संपत आले. त्याचा बाप साधारण माणूस. आजारपणासाठी खूप खर्च केला. बहिणीचं लग्न व्हायचं होतं. शेवटी त्याने स्वत:ची आणि त्यांची विवंचनेतून एका झटक्यात सुटका केली. गेम खल्लास" दत्ता आमचा वॉर्डबॉय मला सांगत होता.

रोज रोज या यातना मी उघड्या डोळ्याने पहायचे. काहींच्या कमी करण्यात यश मिळायचं, काहींच नाही. जन्ममृत्यूच्या काठावर सगळ ज्ञान, विज्ञान, बुध्दी, नवी औषधं, नवे शोध सारं काही मातीमोल ठरतं. यालाच कोणी देव नाव देत कोणी दैव. हा जो कोणी आहे त्याची शक्ती आणि लीला दोन्ही अगाध आहेत. याच्या पुढे सारेच नतमस्तक होतात.

रघुवीर सारख्या केसेस नेहमीच व्हायच्या. काळाच्या ओघात आठवणीतून निसटून जायच्या. मात्र त्यातला काही अंश मनात उरुन जायचा. मी अनुभवलेल्या प्रत्येक केसेसवर मी लिहायला घेतले तर एक थिसीस तयार होईल. काही आठवणी मनात काही कागदावरच ठीक आहेत.

९/४/१९८१

मेडिकल मधल्या अनुभवांनी यांनी मला खूप कणखर बनवलं. विपरीत परिस्थितीत धैर्याने सामोरे जाणे, स्थिती आणि भोवतालची माणसं सावरणे, निर्णय घेण्याची क्षमता असं खुप काही. माझं व्यक्तिमत्व घडवण्यात मेडिकलचा फार मोठा वाटा आहे. एच.एच्या सभासद दिवसेंदिवस वाढत आहे. सगळ्यांच्या सहकार्याने एकेक पेशंट सेटल होत आहे. आज आमची मिटींग घेतली. मी आठवडाभर नाही. त्यामुळे माझ्या केसेस सगळ्यांना समजवून सांगितल्या. या एच एच ने मला खूपसारे मित्र-मैत्रिणी दिलेतं. विचारांच्या देवाण घेवाणात मला नवे लोकं नवे विचार उमगत गेले. मला मी लहानपणाची हट्टी आणि कोणाचं मत न विचारता स्वत:चं मत इतरांवर लादलेलं आठवून हसू आलं. मी काय होते आणि आज काय आहे. माझ्यातले बदलं, मी नेहमीच आढावा घेत रहाते किंवा मला आवडतं आपणच आपल्यात डोकवणं.

१५/४/१९८१

कुमुदला कालच दवाखाण्यात आणलं. कळा तिला सोसवत नव्हत्या. एवढ्या वेदनांमधे सुमीची चौकशी करायच हिला सुचलं कसं. तिला एक आठवडा वेळ आहे. मी लहानपणच्या आठवणीत रमवायचा प्रयत्न केला. तर कशाला आनंदी क्षणांना जागं करतेस. त्यानां माझ दु:ख नको देऊ. हे ऐकून माझी विकेटच उडाली. ".माझी काळजी करु नको हे दु:ख क्षणभंगूर आहे. माझ्या उरात याच्या हजारपट दु:खाचा साठा आहे. मी आजवर त्याच्यासकट जगत आले" हे ऐकून माझे विरहाचे दु:ख मला तिच्या दु:खापूढे थिटे वाटले. मी जवळची मैत्रीण तिच्या वेदना मी साहू शकत नाही. कमी करु शकत नाही. हा विचार करुन मी अस्वस्थ झाले. गुंदेचा कुटुंबाने कोणीच येणार नाही आणि आमच्या कुटुंबाचा आधार ज्याने हिरावला त्याचं तोंड पहायचं नाही, असा निरोप एका नातेवाइकाकडून पाठवला. कुमुदने पोटातल्या गोळ्यासाठी खूप ऐकले. ती आता आई होणार होती. त्या क्षणी तिला एकच काळजी वाटत होती. ती या बाळाला घेऊन कुठे जाईलं? कसा सांभाळ करणार? निरंजन दादावर अजुन एकाची जवाबदारी वाढवायची. या विचारांनी ती हैराण होती. मी तिला फसवे आश्वासनं देत होती.......

आणि तिन्ही सांजेला कुमुदने एका गोंडस बाळाला जन्म दिला. कुमुदच्या डोळ्यात तीच काळजी बघून मला धस्स झालं. बाळ-बाळंतीण सुखरुप आहे, पण पुढे काय? या सर्वात मला निरंजन दादा आणि वहिनीचं कौतुक वाटलं. ते दोघं कुमुदच्या पाठीशी होते. त्याला त्याचा संसार आहे त्याला दोन मुलं. दोघांच्या वागण्यात कुमुद आणि तिच्या बाळाचं आम्हाला करायला कसं जमेल हा भाव नव्हता. दु:खात, संकटात जी आपला साथ सोडत नाही ती खरी आपली माणसं.

१८/४/१९८१

दोन दिवस दवाखाना, डब्बा पोहचवणे, यातच गेलेत. मी दुपारी निघणार तेवढ्यात सुहासदाचा फोन आला. निघू नकोस. सुमीला त्रास होतो आहे. आम्ही तिला घेऊन तिथेच येत आहोत. सुमीची तब्येत ठीक नव्हती. नॉर्मल डिलीवरी शक्य नव्हतीच. मी डॉक्टर पेंडसेंना भेटायला गेले. ओळखीचे असल्यामुळे त्यांनी मला ओ.टी.मधे येण्याची परवानगी दिली. तिला ताबडतोप ओ.टीत नेले. एनस्थेशिया दिला. सुहासदाने इतर सोपस्कार पूर्ण केले. मी फॉर्म वाचला, त्याने बाळाचा नाही सुमीचे जीवदान मागितले. आज प्रेमाची दुसरी बाजू मी अनुभवली. बाळंतपण कठीण होते. बाळाच्या गळ्याभोवती नाळेचा वेढा आवळल्या गेला आणि बाळ जन्मल्यावर रडलेच नाही. पेडिट्रीशिअन प्रयत्न करत आहे. बाळ इनक्यूबेटर मधे चोवीस तास ऑबज़रवेशन खाली आहे. काचेच्या पेटीतला इवलासा जीव श्वास घेण्याचा प्रयत्न करत होता. तिचं नाव मी कांचन ठेवलं. तिचं सोनेरी गोरेपण काचेच्या पेटीत चमकत होतं.

२०/४/१९८१

कुमुदची डिलीवरी नॉर्मल झाली होती. तिला आज डिस्चार्ज मिळणार होता. सुमी आणि सुमीचं बाळ बघते आणि मग घरी जाते हट्टालाच पेटली. सुमीच्या बाळाची तब्येत अचानक बिघडली आणि मृत्यू शी झुंज देता देता थकलेल्या इवल्या कांचनचा श्वासोश्वास थांबला. मी मेडिकलमधे अशा किती केसेस जवळून बघितल्या असतील पण आज जी कळ माझ्या काळजात उठली ती या आधी कधीच अनुभवली नव्हती. सुमीची भूल उतरली नव्हती. मी आणि कुमुद दोघींना काय बोलावं कळत नव्हतं. सुमीला सावरायला हवं. सुहासदाचा भकास चेहरा बघवत नव्हता. आम्ही सगळेच सुन्न झाले होतो, कोणी कोणाशीच बोलतं नव्हतं. अचानक कुमुद उठली. एक वेगळीच चमक तिच्या डोळ्यात मी बघितली. मी काही अंदाज घेण्याच्या आधीच ती तिच्या बाळाला छातीशी धरुन सुमीच्या खोलीकडे धावली. आम्ही सगळेच तिच्या मागे धावलो अणि बघता बघता आमच्या समोर रिकाम्या पाळण्यात बाळाला टाकून आपल्या खोलीकडे गेली.

हे सारं अचानक आणि अनपेक्षित होतं कोणालाच बोलण्याचा धीर झाला नाही. मी धावत तिच्या खोलीत गेले. ती ओक्शाबक्शी रडत होती. मला आवरण्याचा धीर झाला नाही. आम्ही खूप वेळ रडत होतो. कसंबसं आम्हा दोघींना आईनी सावरलं.

सुहासदा मागोमाग आला. कुमुदचे हुंदके थांबत नव्हते. स्वत:ला सावरत तिने सुहासदा ला आवाज दिला. तो खाली मान घालून उभा होता.

“प्लीज. माझ्यासाठी एवढ करं. एवढ्या मोठ्या जगात मी एकटी या बाळाला घेऊन कशी जगू? मी आजवर याच्यासाठी जगले. आता कुठलं ओझं पेलायची माझ्यात ताकद नाही. सलीलसोबत माझ्यातलं बळ संपल. आयुष्याने दिलेले घाव मी सहन केले. आता सहनशक्ती संपली.” हात जोडत कुमुद विनवण्या करत होती, यातलं सुमीला काहीच सांगू नका. मला माहित आहे ती बाळासाठी किती अधीर आहे कुमुदसाठी, सुमीसाठी सुहासदानी ते बाळ छातीशी घट्ट धरलं. आता कोणीच या विषयावर बोलणार नव्हतं.

२१/४/१९८१

सुमीला  बाळाला पाहून केवढा आनंद झाला. डॉक्टरांनी तिला आराम करायला सांगितलं. आम्ही सिस्टर, डॉक्टर सर्वांना याबाबतीत सुमीला काहीच न सांगण्याची विनंती केली. डॉ.पेंडसेना दोघींबद्दल सगळं माहितीच होतं. आईने ती बाजू सावरली. संध्याकाळी सुमीने सुहासदाला कुमुदबद्दल विचारले. जड मनाने त्याने कुमुदच बाळ गेल्याचं सांगितलं. सुमी खूप हळहळली. कुमुद खोलीत आली आणि दोघी खूप रडल्या. सुमी म्हणाली अगं कुमुद माझं बाळ तुझंच आहे. हे ऐकून तर आमच्या सर्वांच्या डोळ्यात पाणी आलं. कुमुद डिस्चार्ज होऊन घरी गेली. सुमीला चार दिवस दवाखान्यात रहावं लागणार.

२४/४/१९८१

मी कुमुदच्या घरी गेले तर कुमुद सामानाची बांधाबांधी करत होती. ही ओली बाळंतीण काय करते? कुठे जाणार? कुमुद माझ्या कुशीत शिरुन रडायला लगली. तिचा आवेग कमी होई पर्यन्त रडू दिलं. तिच्या मनातलं मळभ निवळायलाच हवं. मी तिला समजवून सांगण्याचा प्रयत्न केला असला वेडेपणा करु नकोस. आपण मार्ग शोधू. आईनी तिला धीर दिला. कुमुदला नागपूरला घेऊन जायचा माझा विचार मी आईला सांगितला. तिला पटणार मला ठाउक होते. कुमुदला जागा बदलण्याची आवश्यकता होती. कदाचित हे दु:ख त्याने कमी होईलं.

मला आणि आईला उद्या निघायला हवं. निरंजनदादा कुमुदला दहा दिवसांनी नागपूरला सोडणार आहे. कुमुदला आरामाची गरज आहे. सुमी-सुहासदाला भेटून आम्ही निघालो. सुमीला बाळाचा आनंद झाला पण तो तिला व्यक्त करता येत नव्हता. आम्ही सारे तिला काहीच न झाल्याचे भासवत होतो. कोणापासून दु:ख लपवून आनंदाचा उसना आव आणता येत नाही. सुमीला वाटलं आम्हाला कुमुदबद्दल वाईट वाटत आहे. माहित नाही हे गुपित किती दिवस गुप्त रहातं .

२६/४/१९८१

या धावपळीत प्रसन्नाचे पत्र आले का विचारायचं राहून गेले. दोन दिवस वाट बघू. एच.एच.च्या ऑफिसमधे कुमुदची आठवण आली. तिच्यासाठी कुठलं काम मिळू शकेल का मी या विचारात होते. तसं तिला अजून एखाद महिना आरामाची गरज आहे. कॉलेजमधे बरीच कामं होती. पेन्डींग कामं. आणि केसपेपर स्टडी करता करता नाकी नऊ आले. अभ्यास तर पुष्कळ बाकी होता. सुमी-कुमुदचा विचार मला कुठलंच काम सुचू देत नव्हते. आईबाबांनी मला सावरलं, समजवून सांगितलं. या प्रसंगाची नुसती आठवण आली तरी माझ्या हृदयाचे ठोके वाढायचे. एक आईच असा निर्णय घेऊ शकते. आपलं बाळ दुसऱ्याच्या पदरात टाकणं, मैत्रीण असली म्हणून काय झालं. यावर आईबाबांशी बोलले. आईचं म्हणणं कुमुद जवळ पर्याय नव्हता, तिचं जेमतेम शिक्षण, भावावर आणखी किती ओझं टाकणार हा विचार. ती आधीच खचलेली त्यात बाळाच संगोपन एकटीने करायचे सोपी गोष्ट नाही. सुमीकडे तिचं बाळ सुरक्षित आहे, त्याचे संगोपन नीट होईल या विचाराने तिने हा घेतलेला निर्णय योग्य. तुला आई झाल्यावर कळतील या गोष्टी. प्रत्येक आई आधी आपल्या बाळाची सुरक्षा बघते. मग ते बाळ चिमणीचं असो किंवा वाघिणीच.

१०/५/१९८१

प्रसन्नाचा फोन आला आणि पत्र पण. हे पत्र त्याने दहा दिवसापूर्वी पाठवले होते. कुठल्या तरी महत्वाच्या कामात बिझी आहे. बहुतेक मी देहरादूनला जाईन. सुमी-कुमुद बद्दल वाचलं. भेटल्यावर बोलू. कुमुदनी योग्य निर्णय घेतला. तिला वर्धा सोडण्याची घाई करु देऊ नको. तिच्या साठी सेवाग्रामला काम आहे. तिला समजवून सांग. तू तिला नागपूरला आणलं हे बरं केलं. मी कुमुदला पत्र दाखवलं. तिला हायसं वाटलं. कुमुद आल्यापासून आज माझ्याशी खूप बोलली. आणि ते गरजेचं होतं. तिला बाळाची आठवण येत होती. ते सुखरुप आहे या कल्पनेने ती आपल्या ममतेवर मात करायचा प्रयत्न करत होती.

सेवाग्राम, हो प्रसन्नाचा खास मित्र जयदीप असतो तिथे. त्याची आई दिपाली सरदेसाई त्या वकील आहेत. त्यांच्याकडे तर नाही ना? याने अर्धवट माहिती दिली. असो त्याने सांगितले आहे तर नक्कीच काम होणार.

२५/५/१९८१

बरेच दिवसांनी परिस्थिती स्थिर असल्याचे जाणवते आहे. सुमी-सुहासदा आनंदात आहेत. कुमुद सावरायचा प्रयत्न करते आहे. सुमीनं घरच्या घरी बारसं केलं. नाव नचिकेत ठेवलं. माझी फायनलची तयारी सुरु आहे. मधला काळ मन हेलावणारा होता. खुप दिवस अभ्यास झालाच नाही. तरी बरं एच.एचचे काम सगळे मिळून बघतात. आज मी ओर्थोपेडिकच्या ओ.पी.डीत भयंकर केस बघितली. एका अपघातात पेशंटला अंगभर फ्रॅक्चर झालं होतं. अख्ख शरीर प्लॅस्टरमधे गुंडाळल्या गेलं. शिवाय पाठीला असं खरचटलं होते की त्याला ठेवायच कसं का प्रश्न सगळ्यांना पडला होता. हात, पाय, कॉलर बोन, ॲन्कल सारेच अवयव तुटलेले, सगळ्याच टिश्यू नाजुक अवस्थेत होते. दामोदर, गेली पंधरावर्षांपासून तो या डिपार्टमेन्टमधे काम करतो त्याने पेशंटला धक्का न लावता प्लॅस्टर केले. इतकी सफाईतर माझ्या हातात नाहीच. मी चकित झाले.

फायनलची परीक्षा जवळ येत होती आणि माझे टेन्शन वाढत होते. यंदाही एका झटक्यात विषय निघायला हवेत. नाहीतर अजून सहा महिने मुक्काम वाढायचा. मी माझं मन अभ्यासाकडे वळवत आहे..

>.....<

नचिकेतला एक क्षण सुचेना. बाळाचं नाव त्याने वाचले आणि त्या क्षणी तो सगळंच विसरला. ती डायरी, डायरीतील माणसं, त्याला एकच कळत होतं आपण सुहास आणि गार्गीचा मुलगा नाही. मी कुमुद चा मुलगा त्याला दरदरुन घाम फूटला. आईबाबांनी हे सत्य माझ्यापासून लपवून ठेवलं.

त्याला पुढे डायरी वाचायची इच्छाच होत नव्हती.

आता काय उरलं आहे त्यात. गार्गी-प्रसन्नाचं लग्न झाले असेल. भारतात कुठेतरी सेटलं झाले असतील. मुलं बाळं, मजेत असतील. मी कोण आहे? हे मला कळलेच नसते तर....

तेवढ्यात अनु आली. नचिकेतला या अवस्थेत बघून तिला थोडा धक्का बसला. तिला माहिती होतं आज ना उद्या त्याला हे सत्य कळणारच. तिने ती डायरी उचलली आणि ती आईबाबांच्या कपाटात ठेवायला जाणार तेवढ्यात नचिकेत म्हणाला. ठेव ती तिथेच. मला पूर्ण वाचायची आहे.

तुला माहित आहे मी कोण आहे ते? अनुला गदगद हालवत तो म्हणाला.

मी कुमुद आणि सलील गुंदेचाचा मुलगा आहे.

नाही, नाही तू त्यांचा मुलगा नाही. थंडपणे अनु म्हणाली.

तू पूर्ण डायरी वाच. आणि डायरीच्या मागे आतल्या मिनी पॉकेटमधे एक पत्र दुमडून ठेवलं आहे ते नक्की वाचं.

नचिकेत अजूनच त्रस्त झाला. मी कुमुद-सलीलचा मुलगा नाही. मग मी कोण आहे.?

"तू डायरी वाच. मी कॉफी आणते." अनु

अनुचे हे वाक्य ऐकून तो सुन्न झाला. अनामिक जाणीवेने त्याचा देह शहारुन गेला. अधीरतेने परत डायरीचे पान वाचायला सुरवात केली.

१/६/१९८१

आज कॉलेजला सुट्टी आहे. बरेच दिवसांनी मी घरी होते. आई आज सकाळ पासूनच उदास आहे. मी विचारलं पण काही बोलली नाही. थोड्या वेळाने बघितलं आई तुळशी वृंदावनपाशी रडत आहे. मी धावतच गेले मला वाटलं तिला बरं वाटत नसावं. तसं काहीच नव्हतं. आधी आई काही सांगायला तयार होईना. मी आग्रह केला तेव्हा तिने सांगितले. तुझे आजोबा वारले. "आई माझे आजोबा?" आधी तर मला कळलेच नाही. कोणते आजोबा? कुठले आजोबा? नंतर सांगेन म्हणून आई घरात गेली.

मला एक मावशी आणि एक आत्या आहे, बाकी कुठले नातेवाईक मला आठवत नव्हते. आजोबा मी कधीच कोणाच्या तोंडून नाव ऐकले नाही. माझे बाबा देवदत्त प्रभाकर खानोलकर. दुपारी आईला गाठलं. आणि मागे लागली. शेवटी माझ्या हट्टाला वैतागून ती म्हणाली सांगते. यातलं काहीच बाबांना काही सांगू नको.

तुझी मावशी मनाली आणि मी चैताली दोघी यवतमाळच्या आश्रमात लहानाचे मोठे झालो. आश्रमात आली तेव्हा मी चार वर्षाची आणि मनाली एक वर्षाची होती. आम्हाला तिथे एका आजीबाईने सोडले. ती कुठली? कोण? काहीच कळले नाही. आमचे आईवडिल, आमची जात, धर्म आम्हाला काहीच माहित नाही. आम्ही आश्रमात लहानाच्या मोठ्या झालो.

तुझ्या बाबांच पोस्टींग यवतमाळच्या ब्रँचला झाले होते. मी नुकतेच बी.ए करुन नोकरीच्या शोधात होते. बँकेची परिक्षा द्यायची म्हणून बँकेत चौकशीसाठी गेले. तिथेच तुझ्या बाबांची आणि माझी भेट झाली. आमची मैत्री आणि नंतर प्रेम. ह्यांनी मला आश्रमात येऊन मागणी घातली. ते आपल्या घरी भुसावळला गेले. आपल्या आईवडिलांना समजवून सांगण्याचा खूप प्रयत्न केला. त्यांना हे लग्न मान्य नव्हतं. तुझ्या बाबांना दोन भाऊ, दोन बहिणी.

त्यातल्या शामला तुझी आत्या तिचा  प्रेमविवाह त्यांना आवडला नाही. आधी तुझे बाबा आणि आत्या दोघांना “तुम्ही आम्हाला मेले आणि आम्ही तुम्हाला, या घरची पायरी मी हयात असतांना आणि नसल्यावर चढायची नाही.” म्हणून सक्त ताकिद दिली.

आश्रमवाल्यांनी आमचं लग्न लावून दिलं. तेव्हा पासून बाबांनी बँकेत नोकरी करत आपलं पुढचं शिक्षण पूर्ण केलं. मनाली आमच्यासोबत रहात असे. मोठ्या मनानं त्यांनी मनालीची जवाबदारी स्विकारली. ती दिसायला चांगली, यांच्या बँकेत एकजण काम करायचे. त्यांनी आपल्या भावासाठी मागून घेतली. मामांना नोकरी नव्हती म्हणून आत्याला आपल्याकडेच ठेवलं. नोकरी लागताच दोघांचं लग्न आम्ही लावून दिलं.

मला वाटलं त्यांना त्यांच्या आईवडिलांची आठवण येत असणार. लग्नानंतर मी एकदा हट्ट करुन भुसावळला गेले होते. त्यांनी आम्हाला हाकलून दिलं. तुझ्या दोन काकांनी सबंध ठेवण्याचा प्रयत्न केला नाही. तेव्हापासून ह्यांनी त्यांचं नाव टाकलं ते टाकलं. आणि नंतर मागे वळून बघितलेच नाही. तेव्हांच आम्ही ठरवलं आपल्या बाळाचं संगोपन करतांना असल्या चुका करायच्या नाहीत. माझ्या बाबांबद्दल मला आदर आणि अभिमान तर आहेच, आता माझं ते श्रध्दास्थान आहे.

आई मला कधी बोलली नाही. तुझ्या बाबांचे आदेश आहेत न सांगण्याचे. ते न सांगण्याचा उद्येश्य एवढाच, जो भूतकाळ आपण बदलू शकत नाही, मनं वळवू शकत नाही मग ते उगाळून किंवा उजळून काय उपयोग समजा तुला कळलं असते तर तू काय केले असते नुसती हळहळली असती. परिस्थिती बदलली नसती आणि नेमका  बाबांचा हाचं स्वभाव तू घेतलास.

सकाळीच मला आत्याकडून आजोबा गेल्याचं कळलं. आधी माझं बोलणं पूर्ण ऐकून घे, माझ्या तोंडावर हात ठेवत आई म्हणली. अगदी बाबांसारखीच ग. घाई रिअक्शन द्यायची घाई. मी रडत होते. कारण मला वाईट वाटलं. वडिलांच्या पाया तर पडताच आले नाही.

शेवटची भेट झाली नाही. रक्ताचं नातं इतकं कच्च असतं का मला राहून राहून वाटतं होतं. आणि या दोघांमधे वितुष्ट येण्याचं कारण तसं बघितलं तर मीचं आहे ना म्हणून वाईट वाटलं एवढचं. आत्याशिवाय मला काका-काकू एक आत्या अजून आहेत हे कळलं पण बाबा म्हणतात तेच खरं. मला माहित असून उपयोग काय? मला एकचं आत्या आहे आणि एकच मावशी.

बसं. मात्र आई बरेच दिवसांनी मोकळेपणानं बोलली. तिच्या मनातलं मळभ दूर झालं.

३/६/१९८१

आपण कितीही विचार केला तरी आपलं मन भलत्याच विचारांमागे धावत सुटतं. मी त्याला वठणीवर आणण्याचा प्रयत्न करायचे ते परत आठवणींच्या मागे धावायचे. अभ्यासात लक्ष नाही किंवा अभ्यास करायचा नाही असे नव्हतेच. तरी आज माझे मन थाऱ्यावर नव्हतेच. प्रसन्नाची आठवण रोज येते. आजच नेमके मन कावरे बावरे का? व्याकूळ का? कळत नव्हते.

अभ्यासाचे पुस्तक बंद करून मी टेबलावर आपटले. खिडकीत आले, जुन्या कुंडीत नवीन एक घरटं दिसलं. खरंच ही नवी चिमणी केव्हा आली मला कळलेच नाही. परीक्षा डोक्यावर आहे. आज अभ्यास होईलं असं वाटत नाही. असं मला कधीच होत नाही. मी नेहमीच आठवणी मनाच्या खोल कप्प्यात बंद करून ठेवते. त्याचा माझ्या अभ्यासावर कधीच परिणाम होऊ देत नाही. आज का हूरहूर दाटून येते आहे?

७/६/१९८१

आज रोज सारखी खूप दमले आहे. मी बळेबळेच अभ्यास बंद करुन झोपी जाणार तेवढ्यात रात्री अकराच्या सुमारास फोन वाजला. इतक्या रात्री कोणाचा फोन आला या भितीने आम्ही तिघेही हॉलमधे आलो. फोन प्रसन्नाच्या बाबांचा होता. त्याचा देहरादूनला अपघात झाला एवढच सांगितले. तो कसा आहे? कुठे आहे?माझ्या डोक्यात विचित्र विचार येऊ लागले. हातापायाला मुंग्या आल्या. शरीर बधीर झाले. प्रसन्नाचे आईबाबा पुण्याहून देहरादूनला निघणार होते. काळजी करु नको तो सुखरुप आहे. आम्ही तिकडे पोहचल्यावर फोन करतो.

त्या क्षणी मला प्रसन्नाला भेटायचे होते. कसा असेल तो? त्याला खूप लागले का? त्याला त्रास होत असेल का? असल्या जीवघेण्या विचारांनी कंठ दाटून येत होता. हुंदके आवरत नव्हते. फोनची वाट बघण्याशिवाय पर्याय नव्हता.

९/६/१९८१

प्रसन्नाच्या काळजीन जीव वरखाली होत होता. कालपासून आत्याच्या फोनची वाट बघत होते. सकाळी फोन खणखणला आणि सगळेच धावलो. बाबांनी जे सांगितले धक्कादायकच होते. प्रसन्ना आपल्या रेजीमेन्टच्या सहा कॅडेटसोबत शिवालीक हिल्सवर ट्रेकींगसाठी गेला होता. दुसऱ्याच दिवशी बेसकॅम्पचा संपर्क तुटला होता आणि ते त्या हिल्समधे नेमके कुठे अडकले आहेत याचा शोध सुरु होता. त्यांना जौन्सर बवार गावातील काही लोकांनी बघितले. बटालिअनची एक तुकडी त्यांना शोधायला गेली आहे. ती परतली की फोन करणार. मला काहीच सुचत नव्हते देव करो प्रसन्ना सुखरुप परत येऊ देत.

निरोपाची वाट बघायची. एकेक क्षण मला वाट पहाणे अशक्य होत होते.

१२/६/१९८१

डायरी उघडली खरी पण नुसतेच पानं चाळत बसले.

प्रत्येक क्षण प्रसन्नाच्या काळजीनं जीव कासावीस होत होता.

खरं तर परवाच कळले प्रसन्ना सुखरुप आहे. तो जखमी अवस्थेत सापडला. ट्रेकिंग करतांना कदाचित पाय सटकून घसरला. काय झाले? कसे झाले? या पेक्षा महत्वाचे होते ते त्याच्या सुखरुप असण्याचे. माझी घालमेल माझा त्रागा, आई-बाबांना ही कळला असावा म्हणूनच त्यांनी माझा देहरादूनला जाण्याचा निर्णय मान्य केला. बाबांनी सगळी व्यवस्था केली. आधी दिल्ली नंतर देहरादून. दिल्लीला प्रसन्नाचा मित्र बलजित घ्यायला येणार होता.

१४/६/१९८१

आजच बाबांनी गाडीत बसवले. अकराशे पैकी निम्मा प्रवास मी पार केला होता. एकटीच प्रसन्नाच्या ओढीने उरलेला पार करणार. दिल्लीहून अजून अडिचशे किलोमीटर पुढे जाऊन प्रसन्ना भेटणार होता. प्रवास करण्या पलीकडे माझ्या जवळ पर्याय उरला नव्हता. विचरांच्या गर्दीने भांबावलेल्या अवस्थेत डायरी लिहवत नाही. डब्यात अंधार झाला. मी ही डोळे मिटून घेतले.

२३/६/१९८१

मी आज डायरी आर्मी हॉस्पिटलमधे बसून लिहिते आहे. प्रसन्ना माझ्या समोर बेडवर जीवन-मृत्यूशी झुंजतो आहे. माझी आज तीच अवस्था आहे जी मी इतके वर्षांपासून मेडिकल कॉलेजमधे अनुभवत होते. मला आज  पेशंटच्या नातलगांची तळमळ, त्यांची वेदना कळली. आपल्या जवळचा व्यक्तीला असे पाहून नक्की काय वाटतं ते कळलं.  अर्चना आत्या, बाबा सगळे काळजीत होते. प्रसन्ना शुध्दीवर येत नव्हता. जर बाहेरचा मार आहे तर आत्ता पर्यन्त तो शुध्दीवर यायला हवा. मला आर्मी हॉस्पिटलचे डॉक्टर रिपोर्ट दाखवत नव्हते. हेड इनज्यूरी आहे. डोक्याला मार फार लागलेला दिसत नव्हता. आईबाबांच्या आग्रहाखातर मी त्याची शुध्दीवर येण्याची वाट पाहू लागली. बारा तास, पंधरा तास, वीस तास झाले तो शुध्दीवर आलाच नाही. मला रिपोर्ट दाखवला नाही. मी डॉक्टर आहे. मला ते का दाखवत नाही कळत नव्हतं. बलजीतच्या कानावर घातलं. प्रसन्नाच्या इतर मित्रांच्या कानावर घातलं. त्यांनाही काही कळेना......

नाइलाजाने त्यांनी रिपोर्ट दाखवलेत.

२४/६/१९८१

आज पहाटे थोड्यावेळासाठी प्रसन्ना शुध्दीवर आला. त्याचं सारं अंग  दु:खत असल्याचं मला त्यानं इशारा करुन सांगण्याचा प्रयत्न केला. बाबांनी प्रसन्नाला पुण्यात न्यायची परवानगी मागितली. तो पूर्ण शुध्दीवर येई पर्यन्त त्यांनी नेऊ शकत नाही असे सांगितले. माझे इथे येणे, प्रसन्ना भेटणे हे विधीलिखित होते का? याला काय म्हणतात देव की दैव ?

माझा प्रसन्ना सुखरुप होता. आज आईबाबांशी फोनवर बोलले. त्यांनाही समाधान वाटले. आज खूप दिवसांनी मला, आत्या आणि बाबांना शांत झोप लागणार.

२६/६/१९८१

ॲनस्थेशियेचा असर उतरत होता तसा प्रसन्ना आणि इतर शुध्दीवर येत होते. त्यांची जीभ जड झाली होती. हातपाय हालवतांना त्रास होत होता. अंगभर मुंग्या लागल्या सारखं वाटत होतं. बोलतांना त्रास होत होता. प्रसन्नाने मला बघितले आणि खूप वेळ हात सोडला नाही. वेळ लागेल. सगळे ठीक होतील.

मी परीक्षा अर्धी सोडून आल्याचे आत्ता जाणवले. आता काय परत द्यायची. माझ्यावर अशी वेळ येऊ नये म्हणून मी किती अभ्यास केला. पण नियतीला मंजूर नव्हतं. माझ्या तोंडून पहिल्यांदा नियती शब्द निघाला आणि माझे मलाच आश्चर्य वाटले. आठवड्यापासून प्रसन्नाला बघते आहे. मला जनरल वार्डातील पेशंटचे नातेवाईक व्हरांडयात ताटकळत का बसलेले असतात आज कळलं. बर्नवार्डात मरायला टेकलेल्या पेशंटच्या डोळ्यात आपल्या माणसांसाठी जगण्याची ईच्छा असते. स्वत:साठी नाही. हे उमगलं.

बाळंतीणीच्या कळांनी का आईच्या डोळ्यात पाणी येते हे समजलं. परिस्थिती माणसाचा श्रेष्ठ गुरु बाबा का म्हणतात ते आज कळलं. गेल्या दहा बारा दिवसात मी खूप काही शिकले. ही शिदोरी माझ्या पुढच्या आयुष्याला कामी पडणार नक्कीच.

नचिकेतला काहीच कळत नव्हतं. हे काय घडतयं. ही डायरी नक्की कुणाबद्द्ल आहे?

एखादा चित्रपट बघावा तसं काहीसं या डायरीत घडत आहे. त्या गार्गीला सलाम. ही आत्ता कुठे असेल? तिचं आणि प्रसन्नाचं लग्न झालं असेल का? या प्रश्नांची उत्तरं मिळावे म्हणून तो परत स्मृतींच्या पानांमधे हरवून गेला.

१०/७/१९८१

मी प्रसन्नाला पुण्याला सोडून मी नागपूरला आले. फोनवरुन आईबाबांना जरी कळले होते तरी आम्ही प्रसंगातील गंभीरता त्यांना सांगितली नव्हती. आल्या आल्या मला तर आईने कुशीतच घेतले. मला त्यांना बघून खूप रडू आले. या प्रसंगात ते माझ्या पाठीशी खंबीर उभे राहिले. कॉलेजमधे मी परिक्षा सोडून का गेले? काय झालं? सगळ्यांचा एकच गलका झाला. शेखर आणि इतर मैत्रीणींनी मात्र मला रामायण सांगायच्या भानगडीत पडू नको. तोंडावर नाही नंतर आपल्या मागे उगाच प्रकरण चिघळतं. तू फायनलला नाही म्हंटल्यावर सगळ्यांनाच आश्चर्य वाटलं आहे. थोडक्यात सांगून मोकळी हो.

आता परत परिक्षेची तयारी. परत अभ्यास. खूप आठवणी. जीवनाचे मला गवसलेले सार घेऊन मी नव्या उमेदीने कामाला लागले. एच.एच चे काम झपाट्याने वाढत आहे. मी नसतांना बरेच पेशंटस सेटल झाले. दिपक, निलीमा नवे मेंबर काम बघत आहेत. आजच डॉ. पैठणकरांना भेटून माझी इंटर्नशिप बद्दल बोलायच होतं..

आज कुमुद आणि सुमीला फोन केला. कुमुद फोनवर बोलली. सुमी तर घरी नव्हती. बाळाला घेऊन कदाचित डॉक्टरकडे गेली असणार. आईबाबांना खूपदा विचारलं. ते दोघे सुमीचा विषय टाळत होते. शेवटी मी चिडून आईला विचारले प्लीज़ आई टाळू नकोस. सुमी-सुहासदा-नचिकेत कसे आहेत? मला का सांगत नाही. शेवटी बाबांनी सांगितले त्यानी माझ्या पायाखालची जमीन सरकलीच. मला दोघींना फोन करायचा धीरच झाला नाही.

खूप प्रयत्नाने मी स्वत:ला सांभाळले. रविवारी वर्धेला जायच ठरवून. रुटीन कामात लक्ष देण्याचा मी फसवा प्रयत्न करत आहे. राहून राहून दोघींचे चेहरे डोळ्यापूढे येतात. बाळ मी बघितले तेव्हा ठीक होते. निमोनिया झाला. ॲडमिट केले. बाळ वाचले नाही.

१८/७/१९८१

अर्चना आत्यचा फोन आला. प्रसन्नाच्या तब्येतीत बरीच सुधारणा आहे. आजकाल मी आठवणी उगाळत बसत नाही. डायरीतील जुनी पानं वाचली. मी अशी होते हे माझंच मला आश्चर्य वाटायचं. हल्ली सतत सुहासदा-सुमी-कुमुद डोळ्यापूढे येत होती.

प्रसन्नाने दिलेली दोन पत्र मी वाचलीच नाही हो त्यानेच सांगितले माझे पत्र मिळाले नाही तेव्हा ही पत्र वाचशील. त्यातलं आज मी एक पत्र वाचायला घेतलं. माझ्या लाडक्या दोडक्या चिंगीला, "हे पत्र मला तुझी आठवण आली म्हणून लिहिले. आज सोमनाथ स्टेडिअम मधे कार्यक्रम होता. खूप बोर झाला म्हणून सरळ उठून आलो आणि तुला पत्र लिहायला घेतले. मला तुझ्या सारखे पत्र लिहिता येत नाही. कॅन्टीनच जेवण बोअर झालं की तुझ्या हातंच अर्ध जळकं अर्ध कच्च थालिपिठ आठवतं. तू माझ्यासाठी सुधाआजीच्या गच्चीवर घेउन आली होती. शूटींग प्रॅक्टीस करतांना तूझं रागानं बघणं आठवतं. मी तुला चिंगी म्हंटलं की मारक्या म्हशी सारखी बघायची. घोड्यावर बसतांना तुझा हट्टी स्वभाव आठवतो. नाही म्हणजे नाही नाहीच आणि हो म्हणजे होच. तूच ठरवणार ते सगळं बरोबर. हल्ली तुझी आठवण यायला कुठलही कारण चालतं. असो. तू इतक्यात एकही कविता मला पाठवली नाही. मी बलजीत, प्रवीण, हेमंत, राजशेखर लपून सिनेमाला जाणार होतो. आमचा डाव फसला. त्यात काय पुन्हा प्रयत्न करु.

(वेड्या गार्गीचा
शहाणा प्रसन्ना)

खरंच माझ्या शहाण्या मी इतक्यात तुझ्याशिवाय दुसरा कुठलाच विचार केला नाही

रे...या चार ओळी खास तुझ्यासाठी:

व्याकूळ डोळ्यात ओघळत्या आसवात
आठवणींचा पक्षी,आज पापणीत आला
मनाच्या गाभार्यातील धीर थरथरला
तेच शब्द तिच विराणी आळवू नको रे
सूटला धीट ताबा आता सावरु नाको रे"

२०/७/१९८१

प्रसन्नाला रोज फोन करते. हळूहळू तब्येतीत सुधारणा होत आहे. आई-बाबा भेटायला पुण्याला जाणारं. डॉ. देवाशिष गोडबोलेंनी मला जनरल वार्डात बोलवले. मी गेले तेव्हा सेकन्ड टर्मच्या बॅचचा तांडा त्यांच्या मागे होता. माझ्याबद्दल त्यांना उडत उडत बातमी लागली असणारं. आता हे खूप दिवस चालणार माझ्या लक्षात आले. संपर्कात आलेल्या डॉक्टरांना परिक्षा का दिली नाही याचे एक्सप्लेनेशन द्यावेच लागणार. त्यातून माझी सुटका नाही.

हल्ली घरी यायला उशीर होतो. आता मला डायरी, एकांत, आठवणींची गरज भासत नाही. या स्थितीला काय म्हणायचे? सवय बदलली की विचारांवर मन, मनातील सतत उठणाऱ्या या तरंगांना मी हावी होऊ देत नाही? की मी आतून बाहेरून माझं एकच अस्तित्व आहे, ते म्हणजे गार्गीचं. मी यापैकी कुठल्यातरी अवस्थेत आहे हे मात्र नक्की. सवयीप्रमाणे मी माझ्यातला बदल टिपण्याचा प्रयत्न करत आहे.

१४/८/१९८१

आज माझा वाढदिवस. काय कमाल आहे प्रत्येक वाढदिवसाला मला प्रसन्ना जवळ हवा असे वाटत असे  आज मला अजिबात वाटले नाही. तो आहेच माझ्यासोबत पावलो पावली. मीच माझ्यातून हरवून टाकला होता काही काळ. भावना आपल्याला विवश करतात आणि मग आपण कुठल्याही थराला जाऊन विचार करतो....

२०/८/१९८१

आज प्रसन्ना माझ्याशी फोनवर बोलला. आणि बरेच दिवसांनी सलत असलेल्या मनाला गारवा मिळाला. मी इकडे झपाटून अभ्यासाला लागले. आता दुसरा कुठलाच विचार करायचा नाही. खूपदा ठरवते. सुमी-सुहास आणि कुमुद या तिघांचा चेहरा आणि बाळ डोळ्यापूढून जातच नाही. आज एक अवघड डिलेवरी झाली. बाळ बाळंतीण सुखरुप पाहून मलाच हायसं वाटलं. रेकॉर्डशीटवर नाव बघितले. सुमन महाजन. ती बाळाकडे बघायला तयार नव्हती

नवरा सोडून गेला तिला. सिस्टर म्हणाली. मी तिला समजवून सांगितले. पण काही उपयोग झाला नाही. इतर कामाच्या नादात ही केस मी विसरुन गेले. आज खूप काम झालं. खततर एच.एचच्या ऑफिसमधे जायचा कंटाळा आला होता. तरी एक चक्कर टाकलीच. नुकतीच एका तान्ह्या बाळाची केस आली होती. केसपेपरवर नाव होतं सुमन महाजन. मी आधी चरकलेच. "ती बाळाला ठेवून पळून गेली." दिपक ने सांगितले. अनाथाश्रमात कळवलं आहे. निदान पंधरा दिवस तरी बाळ हॉस्पिटलमधेच ठेवाव लागेल.

माझ्या आयुष्यातला कसला घटनाक्रम आहे आधी कुमुद, सुमी, प्रसन्ना आणि चिमुकला जीव. मी एका समस्येतून सुटते. तर दुसरी तयारच असते. मनात एक निश्चय केला. निलीमा, दिपकला ही केस मी बघते सांगितले. मी घरी आले. आईबाबांशी चर्चा केली. सुहासदा आणि सुमीला नागपूरला बोलवलं.

२/९/१९८१

आज रीतसर अडॉप्शन प्रोसिजर झाली. दोघांनाही समाधान मिळालेलं बघून बरं वाटलं. ते यासाठी तयार होतील असे वाटलेच नाही. सुमीला परत चान्स घेणे शक्य नाही हे मला डॉ. पेंडसेंनी आधीच सांगितले होते. सुमीला बाळ हवं होतं आणि सुमन महाजनला नको. परत एकदा सगळ्यांना आनंदात बघून मला आनंद झाला. आनंद, समाधान आपल्याच भोवती असतो तो शोधावा लागतो. थोडेसे प्रयत्न, कोणाचे निमित्य होऊन तो आपल्या अंगणात येतोच. सुहासदा-सुमी आयुष्यभर बाळासाठी आसुसले असते आणि मी हे बाळ त्यांच्या पदरात घालण्याचं निमित्य ठरले.

दोघांनी बाळाचं नाव नचिकेत ठेवले.

नचिकेतच्या हातून डायरी खाली पडली.

तू वाचलं सगळं? नचिकेत

हो... अनु

तुला माहिती आहे मी कोणाचा मुलगा आहे? नचिकेत

हो, सुमिता सुहास बोधनकरचा. अनु

नाही! सुमन महाजनचा..नचिकेत

नाही! नीट वाचं. सुमन महाजन ने नऊ महिन्यात फक्त पोटात ठेवलं. सुमिता सुहास बोधनकर या दोघांनी तुला गेले तीस वर्ष आपल्या ह्लदयाच्या कोंदणात ठेवलं आणि अजून तू तिथेच आहेस. ...अनु

अजूनही माझ्यावर प्रेम करतेस. नचिकेत

हो, मला प्रेम म्हणजे काय हे गार्गीने शिकवलं .....अनु

वेडेपणा करु नको. विसरुन जा, असं नाही म्हणणार मी पण तुला कळलेलं सत्य आपल्या नात्यांच्या मधे आणु नकोस एवढच सांगेन मी ...अनु

हा संवाद संपला आणि नचिकेत अनुच्या मांडीवर डोकं ठेऊन रडू लागला.

शांत झाल्यावर त्याने विचारलं, प्रसन्ना-गार्गीचे लग्न झाले?

तू वाच, म्हणजे कळेल. अनु

तू म्हणालीस ते पत्र कुठे आहे? आधी डायरी वाच. थोडच राहिले आहे. विचारांच्या कल्लोळात तो परत डायरी वाचू लागला....

२५/१०/१९८१

आपल्या माणसांचा आनंद, समाधान आपणच शोधायचा आणि वाटायचा. सुहासदा - सुमीचा आनंद बघून मला आनंद झाला. खरच आता आयुष्याच्या वळणावर मागे वळून बघण्याची हिम्मत होत नाही. आठवणी दाटून आल्यात तरी मी घट्ट डोळे मिटून घेते. मुठी आवळून घेते. ना कागदावर टिपते. ना उजळणी करते. त्या जिथून आल्या तिथे परत पाठवते.

डोळे उघडले की उरतो फक्त मी आणि माझे वर्तमान. त्या वर्तमानातच मी जगते

२१/११/१९८१

या डायरीने मला खूप साथ दिली. मला आधार दिला. काही दिवसात मी माझ्या प्रसन्नाकडे जाणार आणि मला आता याची गरज भासणार नाही. माझ्या लहानपणीचे फोटो, प्रसन्नाचे फोटो, मैत्रीणींचे फोटो यात जपून ठेवले आहेत. ही डायरी माझ्या कपाटात कायम असणार, माझ्या आठवणीच्या कपाटात.....

डायरी इथेच संपली. नचिकेत भारावलेल्या अवस्थेत नात्यांची जुळवा जुळव करत असतांना अनुने त्यात दोन पत्रांबद्दल सांगितले होते ते आठवलं. पत्र डायरीतच होतं. एक गार्गीचे दुसरं सुमीचे. त्याला गार्गीने झपाटून टाकलं होतं. त्याने गार्गीचे पत्र वाचायला सुरवात केली:

॥ ॐ॥

१५/१२/१९८६

पुणे

प्रिय सुमी,

हे पत्र तुला मिळेल तेव्हा कदाचित मी या जगात नसणार. मला कॅन्सर झाला आहे. खूप खूप उशीर झाला आहे. आलेला प्रत्येक क्षण मी जगण्यात घालवते. नचिकेत मोठा झाला असेल ना. त्याला बघायची खूप इच्छा आहे. मला परत मोहपाशात अडकायचं नाही, म्हणून नागपूरला आले नाही. मला कोणालाच भेटायचं नाही. राग म्हणून नाही ग. मला जातांना त्रास होईल आणि माझ्या

पेक्षा अधिक तुम्हाला..... माझ्या डायरीची आज खूप आठवण आली. ती धंतोलीच्या घरात, माझ्या खोलीत जे कपाट आहे त्याच्या वरच्या खणात आहे. तिथे माझी एक आवडती साडी आहे आणि काही फोटो आहेत. मी नसले तरी या आठवणी मी तुला देऊन जाईन. आता मात्र मी जे डायरीत लिहिले असते ते तुला लिहित आहे. जायच्या आधी एकदा मनं मोकळ करावं म्हणते.

तुला आठवतो माझं आणि प्रसन्नाच्या लग्नाचा दिवस १० एप्रिल १९८२. किती धुमधड्याकात आमचं लग्न झालं. आपण किती धमाल केली होती. त्या रंगलेल्या गप्पा, तो हळदीचा दिवस, सिमंतीला झालेली गाण्याचे मैफल, ते उखाणे आणि मांडवपरतणीचा थाट. आपण आपले कित्ती फोटो काढून घेतले. हळदीच्या दिवशी आपण किती गप्पा केल्या होत्या. रात्री काय पहाटे तीन वाजेपर्यन्त गप्पा मारत होतो. ते मावशी रागवली म्हणून आपण झोपलो नाही तर जागरणच केलं असतं. माझी पहिली मंगळागौर, पहिली हरतालिका, पहिली दिवाळी, पहिली संक्रांत सगळे सण डोळ्यासमोर येतात. असं वाटत काल परवाची गोष्ट आहे. आपण सगळे, सुहासदा, तू, कुमुद, आईबाबा, निरंजन दादा सगळे मिळून आदासाच्या गणपतीला गेलो होतो. नचिकेत पूर्णवेळ माझ्याच जवळ होता. कोणाचकडे जायला तयार नव्हता..

मी प्रसन्ना सोबत मैसूर, उटी फिरली. आमचं पहिलं वर्ष एकमेकात गुंफलेलं आणि गुंतलेलं होतं. प्रसन्ना मला सगळीकडे बरोबर घेऊन जायचा.

अर्चना आत्या आम्हाला रोमिओ-जूलिएट म्हणायची. आईबाबांना मी धंतोलीचं घर विकत घ्यायला सांगितले. तू तेव्हा खूप मदत केली. तू त्यांना समजवून सांगितलं नसतं तर त्यांनी कधीच घर घेतलं नसतं. आता मी निश्चिंत आहे. माझ्या बाबांना वर्धेच्या घराचं भाडं मिळतं. त्यांना म्हातारपणी त्रास होणार नाही. मी मुलगा असते तर तिथेच राहून त्यांची काळजी घेतली असती. आमच्या पहिल्या दिवाळीला आम्ही कार घेतली. ती दाखवायला आम्ही सगळे नागपूरला आलो होतो. नचिकेत गाडीतून उतरायला तयारच नव्हता. आपण खूप भटकलो, खूप धमाल केली.

मला नेहमीच असं वाटायचं मला हवं ते सगळं मला मिळालं होतं. प्रसन्ना खूप आनंदात होता. लग्नानंतर तीन वर्ष तरी चान्स घ्यायचा नाही असं ठरलं होतं. प्रसन्नाला आणि मला खूप भटकायचं होतं. केरळ, नेपाळ, काश्मिर, राजस्थान आम्ही खूप भटकलो. सगळं कसं सुरळीत चालू होतं. सगळे आनंदात होते. एक ट्रीप मला तूझ्या आणि सुहासदासोबत करायची ईच्छा होती. भारतात नाही. आपण यूरोप ट्रीपला चाललो आहे हे स्वप्न मी खूपदा बघितलं. आता ते पूर्ण होणं शक्य नाही. मी खूप भावनाविवश झाली की मला कवितेच्या ओळी सुचायच्या. त्यानंतर मी दोनचार कविता केल्या.

आजवर प्रसन्नाशिवाय कोणालच माहित नव्हतं, मी कविता करते ते अगदी आईबाबांनासुध्दा. मला ती नेहमीच माझ्यासाठीच, माझ्याजवळ, माझ्या

हृदयातच ठेवायची होती....

## संधिप्रकाश

तिन्ही सांज संधिप्रकाशात

लख्ख उजळून गेली

या प्रकाशात स्वप्नाचे गीत

तरंगून गेले

सोनेरी स्मृतींची एकेक गुंफण

उकलून गेली

मनातील गंधित फुलांची,पाकळी

उमलून गेली

ही आज अन उद्या मधली वेळ

निसटून गेली

या वेळेतील ऋृणानुबंध,हृदयात

उमटून गेले

या अनामिक बंधनातील बंध

निखळून गेले.

निखळून गेले

माझा हा संधिकालच चालू आहे. बधंनातून मी केव्हा निखळून जाईन ठाऊक नाही. असो, याला मी काय म्हणू देवाची ईच्छा, माझ दैव, प्राक्तन, कुठल्या तरी चुकीची शिक्षा, की कुणाचे दृष्ट लागली. राहू दे सुमे मला अजून कळलंच नाही ग, तुला कळलं का?

प्रसन्नाने लग्नाच्या वेळेस दिलेल्या प्रत्येक वचनाला जगला-जगतो आहे. मला भरभररुन प्रेम दिलं. मला हवं ते सगळ दिलं. आजही मला आनंदात ठेवण्यासाठी धडपडत असतो. आणि मी अर्ध्या वाटेवर त्याची वाट सोडून निघाले. कुमुद कशी आहे ग? ती अकालीच पोक्त झाली. तिच्याबद्दल जेव्हा जेव्हा विचार करते, तेव्हा तेव्हा मला खूप वाईट वाटतं. नशीबी संसारसुख नाही असे ती गृहीत धरुन जगतं आहे. सलीलमधे ती गुंतली होती. नियतीला कोण हवं ते ती तुमच्या

कडून हिरावून घेईपर्यन्त कळतच नाही. आता या नियतीचा माझ्यावर डोळा आहे.

सुमे तुला प्रामाणिकपणे एक गोष्ट सांगू. मला जेव्हा कळलं मला कॅन्सर आहे, बरेच वेळा माझ्या मनात यायचं मी गेल्यावर प्रसन्ना एकटा होणार. मग कुमुद आणि प्रसन्नाचं लग्न झालं तर दोघंही आनंदी होतील. मी हे चक्क प्रसन्नाला बोलून दाखवलं तर तो म्हणाला तू सगळ्यांचा आनंद कशात आहे? ज्याला त्याला त्याचा आनंद मिळवून द्यायचा ठेका घेतला आहे का? तुला माहिती आहे सोन्या माझा आनंद तू आहेस फक्त तू. माझ्या आयुष्यात कोणतीही स्त्री तुझी जागा घेऊ शकत नाही. मी तुला असा प्रश्न विचारणारच नाही की समजा मला कॅन्सर झाला असता तर तू काय केलं असतं वैगरे. कारण मला माहित आहे तू तसं केलं नसतं. सो प्लीज़ डोन्ट थींक ऑफ इट.

यालाच प्रेम म्हणतात ना सुमे.....

आज आईबाबांची खूप आठवंण येते आहे. माझ्या मागे त्यांना सांभाळशील ना. ते परवा येणारच आहेत. आधी मी त्यांना बोलवणार नव्हते ग. मला असाह्य बघून त्यांची जी अवस्था झाली असती त्याची मी कल्पना करु शकत नाही. त्यांनी खचलेलं मलाच बघवलं नसतं. नंतर विचार केला, दूर राहून त्यांना विनाकारण हूरहूर द्यायची म्हणून मग बोलवून घेतलं.

माझ्या आजारपणाच कसं कळलं. झालं काय मला उलट्या होत होत्या, चक्कर, मळमळ. मला काय, सगळ्यांनाच वाटलं गुडन्यूज़ आहे. चेकअपसाठी डॉक्टरकडे गेलो. तपासण्या झाल्या. अगदी जसं सिनेमात होतं, रिपोर्ट आलेत, डॉक्टरांचा गंभीर चेहरा, केबीन मधली जीवघेणी शांतता आणि त्यांच सांगणं प्रसन्ना आणि माझा चेहरा पहाण्यासारखा होता. प्रसन्नाने तर परत सगळ्या टेस्ट करुन घेतल्या. त्याचा विश्वास बसत नव्हता. माझ्या पायाखालची जमीनच सरकली. मला डॉक्टर असून कळलं नाही. खरंच कळलं नाही. एका क्षणात माझी भरली मूठ रिती झाली. आठ दिवस तर सगळ्याच संवेदना गोठून गेल्या होत्या. एका भीषण दडपणाखाली आम्ही सारे वावरत होतो. मग माझ्यातली जुनी खूप जुनी गार्गी जागी झाली आणि तिने बघता बघता वातावरण जादूने बदलून टाकले. मी प्रत्येक क्षण जगायचं ठरवलं. हल्ली माझं घड्याळ्याकडे सतत लक्ष असतं. माझ्या जाण्याने जी पोकळी तुमच्या आयुष्यात येणार आहे, त्या पोकळीत जगू नका मला वाईट वाटेल. अजून एक, मी गेल्यावर प्लीज प्लीज कोणीच माझा फोटो भिंतीवर लावू नका. काही आठवणी मनातच जपायच्या असतात ना. भिंतींवर नाही ग.

मागच्या आठवड्यात मला भेटायला माझे मेडिकलचे मित्र मैत्रिणी आले होते. तसे ते वरचेवर भेटायला येतातच. त्यांच्या कडून मला कळले की मेडिकल मधे माझी हेल्पिंग हॅन्ड सोसायटी बंद झाली. मी संपायच्या आधी मी रुजवलेले

माझे विचार संपले. याचे खूप वाईट वाटतं आहे. असो.

मी या कविता माझी किमोथेरपी सुरु असतांना लिहिल्या आहेत. आता या नंतर काही लिहिन असे वाटतं नाही.

(१)

पंख तुटले, सोड मायेची साउली

घे भरारी, निरभ्र निळ्या आकाशी

दूर जरी तू....छाया आहे उशाशी

डोळ्यात झाली आठवणींची दाटी

मायेच्या पाखरा..येशिल का परतूनी ?

(२)

निस्तब्ध भावनांचा कशाला कोंडमारा

डोळ्यात आसवांना उगा दिलास थारा

नको आठवणींचा मांडू नको पसारा

कंठात दाटुन येतो हुंदका एक बावरा

एकटीच बरी मी, कोणाची साथ कशाला

(३)

ओठांना हलकेच स्पर्शून गेला, एक थेंब ओला

आठवणी दाटून आल्या, कळलेच ना रे मना

हृदयी अनेक द्वंद्व, मी अश्रुत भिजूनी चिंब

तिमिरात कधी हरवले, कळलेच ना रे मना

स्पंदनात उसास्यांचा कल्लोळ झपाटलेला

निष्प्राण देह झाला, कळलेच ना रे मना

सुमी, कुमुदची, माझ्या आईबाबांची काळजी घे. आणि माझ्या इटुकल्या पिटुकल्या नचिकेतची पण. माझी डायरी एकदा वाचून बघ. मला त्यातील माझी

ईश्वर विषयची माझी कल्पना आजही आठवते. माझ्यासाठी ती तेव्हा एक शक्ती होती आणि आजही आहे. माझ्या ईश्वराला नाव नाही, रंग नाही, रुप नाही. ती आहे एक अज्ञात आणि दिव्यशक्ती.

तुला पत्र लिहिलं आणि आज मला आतून बाहेरुन मोकळं झाल्यासारखं वाटतं आहे. माझ्यात आता फक्त मी उरले आहे. माझ्यात अभिलाषा नाही, अपेक्षा नाही, खंत नाही, द्‌वेष नाही, वेदना नाही, देणे-घेणे हिशेब नाही, स्वप्न नाही, आसक्ती नाही, जगण्याची उर्मी नाही. आहे फक्त मुक्तीचे तरंग..जाता जाता माझ्यासाठी ही चारोळी:

मावळत्या देहामधे
श्वासाचा हा संग,जणु
हरवलेल्या वाटेवर
मुक्तीचा अभंग

तुझी गार्गी

कुठलाच विचार न करता, वेळ न दवडता नचिकेतने त्याच भारावलेल्या अवस्थेत सुमीचे पत्र वाचायला घेतले.

ॐ

प्रिय गार्गी,

मला माहिती आहे तू या जगात नाहीस. तू आमच्या मनात आहेस, डोळ्यात आहेस. मला आणि सुहासला तू नचिकेत दिलास. मला आईपण तू दिलं, हे मी कशी विसरु शकते. ही डायरी वाचली आणि मला तू नव्याने उमगली....तू आमची मैत्री - माया - शक्ती. तू प्रत्येक पावलासोबत होतीस. दूर असतांना मी तुझ्या आठवणीत होती. प्रामाणिकपणे सांगू, तू मेडिकलला गेल्यावर मला आधार हरवल्या सारखं वाटलं. आता तुला माझी आठवण कशाला येणार? ही नव्या विश्वात रमेल आणि आम्हाला विसरेल. अशी हूरहूर दाटून यायची. डायरी वाचल्यावर तू आमच्यातच गुंतलेली दिसली. अरे हो मी तुझी डायरी, साडी, फोटो तुझ्या आठवणीच्या कपाटासकट उचलून आणलं. डायरीतून खूपशा गोष्टींचा उलगडा झाला. कुमुद तिचं बाळ माझ्या ओटीत टाकतांना तू

तिचा हात का नाही धरला? सांग ना?

तुझं लग्न म्हणजे माझं स्वप्न होतं. तुला प्रसन्नाची नवरी होतांना पहायचं होतं. तुमच्यापेक्षा मलाच आनंद झाला ठाऊक आहे. डॉ. काणेंची ट्रीटमेन्ट सुरु होती. तू इंजेक्शन देतांना मला त्रास होणार नाही इतक्या हलक्या हाताने ते द्यायची. तू नचिकेतमधे इतकी रमायची की आम्हाला तू त्याच्याच एवढी वाटायची. सुहास म्हणतो तेच खरं माझी बहिण म्हणजे एखादं कोडं आहे सहज न सुटणारं.

फायनल सोडून तू प्रसन्नासाठी देहरादूनला गेली. त्याच्या अपघाताचं ऐकून माझी काय अवस्था झाली होती माहिती आहे. मी प्रसन्ना सापडल्याचा निरोप मिळे पर्यन्त देव पाण्यात ठेवले होते. त्या काळात तू त्याच्यासाठी काय काय सोसलं हे मला कधी का बोलली नाही ग. प्रसन्नासाठी सावित्री झालीस. आजही आपला लहानपणाचा दंगा, आईच्या हातचा माझा मार वाचवण्यासाठी तुझी धडपड, शाळेतला पहिला दिवस, कॉलेजचा पहिला दिवस, मधल्या सुट्टीतला डब्बा अदलून बदलून खाणे. आणि तुला आठवतं मला खारावलेले फुटाणे आवडायचे म्हणून तू तुझ्या बाबांना हट्टाने घेऊन मागायची आणि चार-पाच दाणे तोंडात टाकून पुडी मला द्यायची. हे तेव्हा कळलं नाही ग. तुझ्या धीटपणा पुढे आमच्या खोड्या कोणी करायचे नाहीत. तुला आठवतं पाचवीच्या पंकजने मला आणि कुमुदला सुम्माड-कुम्माड चिडवलं तर तू केवढं मारलं त्याला. आणि आता

अशी अचानक अर्ध्यावाटेवर साथ सोडून गेली किती रडलो मी आणि कुमुद ठाऊक आहे का तुला? तू आम्हाला असे पाहू शकली नसती म्हणून तू नागपूरला आली नाही ना.

तुझं प्रसन्नावर प्रेम आहे हे तुझ्या आधी मला कळलं. मीच तुला सांगितलं. आठवतं ना? एवढा जीव कोणी लावतो का? आठवणीनेच डोळे आणि गळा भरुन यावे, सांग ना? प्रसन्नाची पत्रं वाचलीत. काय मजेशीर प्रेम होतं ग तुमचं. तुमची मनं एकमेकांत गुंतली होती. इकडे मरणाच्या दारात टेकली असतांना, जाता जाता प्रसन्ना आणि कुमुदच्या लग्नाचा विचार करतेस. धन्य तुझी माते धन्य. किती वेळा सांगितलं इतरांसोबत स्वत:चा विचार कर. खरच सुहास म्हणतो तेच ठीक. आणि अशी कशी डॉक्टर तू? इतक्या लोकांना बरं केलं, हेल्पिंग हँड सोसायटी तयार केली, इतक्या जणांना मदतीचा हात दिलास आणि स्वत:चा आजार बरा करता नाही आला.

मी तुझी आठवण वैगरे अजिबात काढणार नाही. अगं तुला विसरेन तेव्हा ना.

तू जवळ हवीस असं केव्हा वाटतं सांगू, आवळ्याचं लोणचं करतांना, आंब्याचा, तो दशहरी आंब्याचा रस करतांना आणि हो उडदा-मुगाचे पापड करतांना. तुला लाट्या खूप आवडतात ना. मला तुझ्या सारखं लिहिता येत नाही.

नाहीतर तुला न सांगता बी.ए.स्सीची ॲडमिशन रद्द करुन आर्ट्स कशाला घेतलं असतं. तू त्याबद्दल मला रागावून झालं आहे. कुमुद पण तुझ्यासाठी तळमळते ग. तू आम्हाला दिलेली साथ कशी विसरेन. देव असेल तर माझं आयुष्य तुला देईलं, छे, माझाही आज देवावरचा विश्वास उडाला. तो भेटला तर विचारेन, तू माझ्या निष्पाप मैत्रीणीला का घेऊन गेला? तिचा अवेळी मृत्यू म्हणजे तिचे प्रक्तन, दैव, कुठल्या चुकीची शिक्षा, दृष्ट कोणाची लागू दिली रे?त्याला सगळेच हिशेब मागणार मी. तुला काय वाटलं कविता तुला एकटीलाच करता येतात.....तू मला दाखवलेले आकाश बघं वाचून.

## स्वगत

विरघळलेल्या आशेमधून
माझ्यातलं मी पण उठून
उभ राहिलं-मला म्हणालं
असच जाऊ देते मला
तळहातावर घेउन बघ.

तळहातांवरच्या रेषांमधून
माझ प्राक्तन मला शोधत

मनात आलं-मला म्हणालं
असच जाऊ देते मला
डोळ्यात साठवून बघ.

डोळ्यातले स्वप्न दडलेल्या
विचारांमधून वाट काढत
ओठावर आलं-मला म्हणालं
असच जाऊ देते मला
एकदा नवा श्चास घेउन बघ

घुसमटलेल्या श्वासांमधून
उसासे बाहेर पडले तळमळत
मला म्हणाले-केव्हा पासून या
मोकळ्या आकाशाची वाट बघत होतो.

तुझी सुमी

डायरी, पत्र वाचून झाल्यावरही पानं चाळत नचिकेत टेरेसवर उभा होता. त्याला काहीच सुचत नव्हतं. त्याच्या सगळया जाणीवा बधीर झाल्या होत्या. एकीकडे त्याच्या आयुष्यातलं सत्य त्याच्या समोर उभं होतं आणि एकीकडे आजवर आपण जे आयुष्य जगलो ते, दोघांमधे आपण भरडत चाललो आहे याची तीव्र जाणीव झाली. सत्य आणि वास्तव, दोन्ही स्वीकारू शकत नव्हता, झिडकारु शकत नव्हता.

"नचिकेत ए नचिकेत, जेवायला चलं. अनुने हाक मारली, तसा तो भानावर आला.

"प्लीज, भुक नाही वैगरे डायलॉग मारु नकोस. मला तुझ्या मनस्थितीची चांगलीच कल्पना आहे. तुला जे सत्य कळलं आहे ते तू मनावरच घेऊ नको असं मी म्हणणार नाही. असं काही करु नको किंवा वागू नको ज्यामुळे आईबाबांनी इतके वर्ष जे सांभाळलं, ज्या आठवणी जपल्या त्याला धक्का लागेल." अनु समजावणीच्या सुरात म्हणाली.

"म्हणजे तुला म्हणायचे आहे, मी माझी खरी आई तिच्याबद्दल जाणून घ्यायचा प्रयत्न करायचा नाही" नचिकेत

"तुला कळलं नाही मला नेमकं काय सांगायच ते. तुला जन्म देताच पळून गेलेल्या आईची तुला कीव आली. पण ज्यांच्यामुळे तू आपल्या पायावर उभा आहे, तुला काहीच कळू न द्यायचा ज्यांनी सतत प्रयत्न केला, त्यांची माया, त्यांचे प्रेम, त्यांनी निरपेक्ष तुझे केलेले संगोपन, त्यांची तुझ्यासाठी काळजी, स्वप्न ते सगळं थिटं आहे का? एवढा विचार कर. जा खुशाल जा आपल्या खऱ्या आई-वडिलांना शोधायला. असे म्हणत अनु खोलीतून निघून गेली."

"काय झालं अनु? नचिकेत जेवायला नाही आला?" आजी

काय उत्तर देऊ या घालमेलीत असतांनाच तिने नचिकेतला टेबलाकडे येतांना बघितलं. तिला हायसं वाटलं.

जेवणाकडे त्याचं लक्षं नाही हे बघून "जेवण आवडलं नाही का?" अनुने नचिकेतला हळूच विचारले.

"तुला माझ्या आईसारखी भाजी जमणारच नाही. तुझ्या हाताला ती चवच नाही." नचिकेत

हे ऐकून अनु गालातल्या गालात हसली. आपल्या बोलण्याने नचिकेत नॉर्मल झाला. निदान बोलण्यावरुन तरी तसं वाटत होतं.

"छान झाली आहे हं. आई येणारं की पाच सहा दिवसात. मग करेल ती तुझे लाड." आजी-आजोबा

अनुने ती डायरी, फोटो साडीत गुंडाळून परत आठवणीच्या कपाटात जागेवर ठेवून दिलेत.

नेहमीचं रुटीन सुरु झालं. आज अनुला लायब्ररीत जायचं होतं.

नचिकेत आठ वाजता निघाला. घरातले काम आटपून आजी-आजोबांचा स्वैयंपाक करुन ठेवला.

आजी-आजोबांना गार्गी-प्रसन्नाबद्दल सगळच माहिती असणारं, त्यांना विचारु, नको विचारु संभ्रमात ती निघाली.

आधी नचिकेतशी बोलू. मग काय ते ठरवू.

"नचिकेत, ऐक ना." अनु

"ह्म्म....बोलं..." नचिकेत

"सोड तो लॅपटॉप....माझं ऐक तर"...अनु

"काय झालं...?" नचिकेत त्रासिक होत म्हणाला.

"अरे! आपण जर आजी आजोबांशी या विषयावर बोललो तर..." अनु

"कोणता विषय.. ?" नचिकेत

नचिकेत, तुला माहिती आहे मी काय म्हणते आहे ते. डायरी वाचली तरी काही तरी सुटतं आहे असं सारखं वाटतंय. एक तर पुढे प्रसन्नाचे काय झालं? कुमुद कुठे आहे? काय करते? आपण गार्गीची बाजू वाचली. सुमीच्या म्हणजे आईच्या पत्रावरुन त्यांची भूमिका १९८६ ला उत्तर म्हणून लिहिलेले पत्र यावरुन कळते. गार्गीचे आईबाबा आणि इतरांविषयी आपल्या आजी-आजोबांना नक्कीच माहिती असणारं. १९८६ ते आजपर्यन्त या पैकी आपल्याला कुणीही भेटलं नाही किंवा आपल्याला माहिती नाही. त्यांच्या आयुष्यात पुढे काय झालं असेल, मला जाणून घ्यायचं आहे. आईबाबा ट्रीप वरुन परत यायच्या आत विचारु ना? अनु

"तू मला विचारते आहेस की सांगते आहेस"...नचिकेत

तेच ते. मी उद्याच बोलते आजीशी. अनु

नचिकेतला लक्षात आलं, पूर्ण कथा ऐकल्या शिवाय चैन पडणार नाही. त्याला तो

कोण आहे हे कळल्यापासून हे घर, घरातली माणसं, उगीचच परकी वाटायला लागली. त्याला कळत होतं ही नुसतीच बोचरी जाणीव आहे. अनुचं म्हणणं त्याला पटलं होतं. माझ्या वागण्याने मला कोणाला दु:खवायचे नाही. मनात नचिकेत घोळत होता. सकाळी आठ वाजता नचिकेत ऑफिसला गेला आणि अनुनी आजीला गाठलं. आजी जर एकदा पूजा करायला बसल्या मग लवकर उठणार नाही. या वयात आजीला या विषयावर थेट विचारणं बरं नाही. सुरवात कशाने करायची हा प्रश्न होताच. आजींची आवडती मालिका "अग्निहोत्र" थोड्यावेळातच लागेलं, लक्ष वेधायला अनुने लग्नाचे अल्बम टी.व्ही.समोर आणून ठेवले.

आजीशी गप्पा मारता मारता ती नाश्त्याची तयारी करु लागली.

अनुचा अंदाज बरोबर ठरला. घड्याळाकडे बघत आजीने  विचारलेच, अगं अनु अल्बम इथे कसा काय..?

काही नाही असेच. चला ना पाहू. आजीने आधी टाळम टाळ केली. नंतर तयार झाली. आठवणी रंगत आल्या. एकेक फोटो दोघी बघता बघता, अनुने हळूच विषय काढला. लग्नात माझ्या आईच्या मैत्रीणी आल्या होत्या वैगरे आणि विचारलं, आईंच्या मैत्रीणींचा फोटो नाही दिसत. लगेच आजीने एक ग्रुप फोटो दाखवला.  हे तर आईंच भजनी मंडळ. त्यांची एखादी बालमैत्रीण वैगरे. अनुने विचारताच आजीचा चेहरा खर्रकन उतरला. अनुला

स्वत:चाच राग आला. आपण उगीच विचारलं असं तिला वाटतं होतं.

आजी सॉरी, आत्ताच्या आत्ता आजीला सगळं सांगून टाकावं असं तिच्या मनात आलं.

अनुभवी आजीने अनुला काहीतरी सांगायचे आहे हे हेरलं.

काय झालं अनु? तू एवढी त्रासिक का?

त्या क्षणी अनुने ठरवले आता आजीला सगळं सांगायचं.

तिने आजीला आठवणींच कपाट, डायरी, पत्र आणि फोटोंबद्दल सांगितलं.

म्हणजे तुला सगळं कळलं तर. अनुला अपराध्यासारखं वाटतं होतं.

अग, वाईट नको वाटून घेऊ. तुला सगळं जाणून घ्यायचा अधिकार आहे.

आजी स्वत:ला सावरत म्हणाल्या.

त्यांच्या मैत्रीबद्दल तू वाचलंच आहे. सुमी- सुमिता म्हणजे माझी सुन अर्थात सुहासची बायको. मी तीच आत्या- शामला आत्या, गार्गीची आत्या. लहानपणापासून बघितलं मी तिला, अंगाखांद्यावर खेळवलं, पोर हट्टी होती. खूप समजुदार आणि गुणी होती. खूप माणसं जोडली तिनं आणि त्यांच्यावर खूप प्रेम केले. दिसायला म्हणशील तर सावळीच.

धारधार नाक, कमालीची तेज, उफराटा बांधा, बोलण्यात पटाईत. इतर मुली करायच्या तशी कामं, रांगोळी, भरतकाम, विणकाम या सगळ्यात कधीच रस नव्हता. सडेतोड बोलणं, हो किंवा नाही हे दोनच पर्याय. प्रचंड आत्मविश्वास अगदी माझ्या बाबांसारखा.

बाबांबद्दल तू वाचलच आहेस. आमचे बाबा प्रभाकर खानोलकर आणि देवदत्त यांची मनं दुभंगली आणि कधी जुळलीच नाही. मी आणि देवदत्त घराबाहेर पडतांना जी आमच्या घरच्यांची भेट झाली ती शेवटची भेट. आम्ही दोघं उंबरठ्यावर खूप वेळ घुटमळलो. कोणालाच पाझर फुटला नाही. त्यानंतर आयुष्यात इतके सुख-दु:खाचे प्रसंग आलेत, कोणी कोणालाच भेटलं नाही. चैताली वहिनीला या गोष्टीचं खूप वाईट वाटायचं. देवदत्त समोर बोलायची सोय नव्हती. आपणच या सर्वाला कारणीभूत आहोत याच विचारानं खंगून गेली. हे सारं तुला माहिती आहे. मला म्हातारीला आठवले म्हणून सांगितले.

गार्गी, सुमी आणि कुमुद जिवाभावाच्या मैत्रिणी. एकाच बाकावरच्या. तिघी खूप गप्पा मारायच्या. कुमुद खूपच साधी अगदी गाय हो, सुमी हौशी, तिघी तिन टोकं पण जुळलेले. तुझे आजोबा तर त्यांना त्रिकूट म्हणायचे. उन्हाळ्यात आम्ही खूप पत्ते खेळायचो, गच्चीवर आईसक्रीम पार्टी करायचो, ते दिवस आठवले की बरं वाटतं.

कुमुदचं पहिल लग्न फसलं. दुसरं नियतीने फसवलं. कुमुद नंतर समाजसेवेत रमली, किंवा विरंगुळा म्हणून तिने तो मार्ग स्विकारला होता. आयुष्यातील दोन अपघटितांमुळे ती नेहमीच अलिप्त रहायला लागली होती. आधी आश्रमशाळेत जायची. गुंदेचा लोकांनी सबंध तोडला आणि शाळा बंद झाली. मग समितीच्या ऑफिसमधे कामं करत होती. वर्धेच्या समीतीच्या मुख्य आचार्यबाईंची खूप लाडकी. तिने सुमीच्या पदरात टाकलेलं बाळ निमोनियाने गेलं आणि तिने वर्धा सोडलं. नागपूरच्या भगिनी संस्थेत आचार्यबाईंनी तिची रहाण्याची सोय केली. आधी ऑफिसची कामं मग समितीच्या बैठकीला येऊ लागली. छोट्या छोट्या गांवांमधे समितीचा प्रसार करता करता, तिची नागपूर केंद्राची सहसचिव म्हणून नियुक्ती झाली. खूप वर्षांपूर्वी ती नागपूरला भेटली होती. आता ती पूर्वीची साधी-भोळी कुमुद नाही. समितीत मोठ्या पदावर आहे म्हणे. अधे-मधे पेपेरमधे वाचले होते. पचमढीच्या जवळ आदिवासी गावात कुठली तरी शिक्षण संस्था चालवतं आहे. परिस्थितीने अलिप्त, अबोल, साध्या कुमुदला कुठल्या कुठे पोहचवलं. आपल्या नशीबी जे नाही त्याचं दुखणं गात रहाण्यापेक्षा इतरांना सावरतं स्वत:ला सावरलं. धीट आणि खंबीर कुमुद बघून आनंद झाला
.

माझी सुमी, आमच्या दोघीतलं नातं कधीच सासू-सुनेचं नव्हतं. खरं सांगू, हे सारे

दादाच्या अंगणात सागरगोट्या, लपाछपी, लगोरी खेळत असे. सुहास-सुमीला खेळतांना बघून माझ्या मनात ही माझी सून झाली तर असा विचार येऊन जायचा. तिच्या माहेरी सगळे सणवार, येणारे-जाणारे त्यामुळे लहानपणापासूनच तिला कामाची सवय. रोज दारात रांगोळी काढायची, भरतकाम, विणकाम सारेच गुणं होते. नटण्याची खूप हौस. नेहमीच टापटीप रहायची. तिचा नीट नेटकेपणा मला आजपण आवडतो. तिचा गार्गीवर फारच जीव. लग्नानंतर नाव बदलता येतं त्याचा फायदा घेतला. सुहासला लक्ष्मीपूजनाच्या वेळीस गार्गी नाव ठेवायला लावलं. मला नंतर या नाव बदलण्याचा किस्सा कळला. खूप आधी दोघींची नावावरुन वादावादी झाली. आपल्या नावात आपले व्यक्तिमत्व असते. गार्गी म्हणाली तुझं नाव सुमिता. कोणीही ओळखेलं थोडीशी बावळट असेलच. माझं नाव गार्गी, ती एक ऋषिकन्या आणि विदुषी होती, तिने म्हणे ब्राम्हणमहासभेत ऋषि याज्ञवल्कला हरवलं. माझं नाव ऐकताच कोणीही म्हणेल, एक हुशार मुलगी असेल. गमती गमतीत हा संवाद वादावादीत बदलून गेला. सुमी हिरमुसली. तिला चैतालीने समजवून सांगितलं, आपल्याला आपल्या लग्नात नाव बदलता येतं तेव्हा कुठे दोघींची भांडण मिटलीत.

कायम या तिघींचे भांडण, रुसणं, फुगणं कायम चालू असे. अगदी कुठलीही नवीन गोष्ट, नवीन बातमी आधी एकमेकांना सांगायचं मगच इतरांना. हा नेम त्यांचा बरेच वर्ष टिकला. गार्गीला वाचनाची आवड होती. इंग्रजी पुस्तकं खूप वाचायची. तिला कॅन्सर

झाल्याचं कळलं आणि खूप रडली.

दैव बघ कसं आहे. त्यावेळेस नेमकी आजोबांना बरं नव्ह्तं म्हणून तिची आणि सुमीची शेवटची भेट झाली नाही. गार्गीची मावशी, मनाली, रमाकांत, त्यांचा मुलगा अमेय नंतर एक मुलगी झाली आर्या. मनालीने खूप मदत केली. शेवट पर्यन्त दोघांची सेवा केली. रमाकांतला ऑस्ट्रेलियाला नोकरी मिळाली आणि ते तिथेच गेले. सुरवातीला एकदोनदा वर्धेला आली तेव्हा भेट झाली. आम्ही पुण्याला आल्यापासून ती कधीच भेटली नाही.

सुमी अर्थात गार्गीला सुहासने कधीच नोकरी करु दिली नाही. त्याला आवडायचं नाही. तिने एक दोनदा घरगुती व्यवसाय करण्याचा प्रयत्न केला, जमला नाही. गार्गीची माझी भेट ती किमोथेरपी करुन नागपूरला आली होती तेव्हा झाली होती. ती गेल्यावर प्रसन्ना देहरादूनला गेला. त्याच्याबद्दल उडत उडत ऐकले, कोणी म्हणे तो नेपाळला गेला, कोणी म्हणे हिमाचल प्रदेश. सेवाग्रामच्या त्या वकिलीणबाई आहेत ना...त्यांचं नाव आठवतं नाही, त्यांचा मुलगा आर्मीत आहे. त्या सांगत होत्या, तो लष्करात मोठ्या हुद्यावर आहे. त्याने दुसरं लग्न केलं नाही. तो एका मद्रासी मुली सोबत रहात असल्याच्या अफवा सर्वत्र पसरल्या होत्या. नंतर त्याचं काय झालं? तो कुठे आहे? काय करतो? काहीच माहित नाही. आम्ही एकदोनदा विचारपूस केली खरी. दादा वहिनी असे पर्यन्त त्याने सबंध ठेवलेत.

त्यांच्या साठी त्यानी खूप केलं, दादा आणि वहिनी गार्गीच्या अवेळी जाण्याने फारच खचले. त्यांची आस्था, विश्वास डळमळला होता. वहिनीनी तर अंथरुण धरलं. दोघांनी सुमीने-सुहासने खूपदा नाही म्हंटलं तरी त्यांनी नागपूरचं घर विकलं आणि वर्धेला रहायला गेलेत. तिथेही गार्गीच्या आठवणींनी त्यांचा पिच्छा सोडला नाही.

आमचं पुण्याला यायचं ठरलं. सुहासला चांगली नोकरी मिळाली. आम्ही सगळे पुण्याला निघणार तेव्हाच वहिनी गेल्याचं कळलं. दादा अस्वस्थ झाला. जगण्यासाठी त्याच्याजवळ कुठलं कारण शिल्लक नव्हतं. मी दोनदा पुण्याला आणले. तो थांबला नाही. मन:शांतिच्या शोधात खूप भटकला. देहू, आळंदी, अक्कलकोट, पंढरपूर, गाणगापूर. यांनी खूप समजवण्याचा आणि सावरण्याचा प्रयत्न केला. नंतर नंतर मनाने खूपच खचला. एकदा यांना वर्धेला घेऊन गेला. सगळी इस्टेट एका संस्थेला दान केली आणि परत फिरस्तीला लागला.

लाड-कारंजाला जाताजाता त्याला हृदयविकाराचा झटका आला आणि त्याला कायमची मुक्ती मिळाली. आम्ही पुण्यात आलो तेव्हा सुहास-सुमी अर्चनाकडे म्हणजे प्रसन्नाकडे गेले होते. ते खचलेले होते. आधिच एका पायाने अधु त्यात त्यांना अर्धांगवायुचा झटका आला आणि काही दिवसात ते देवाघरी गेले. प्रसन्ना-सुहास-सुमी अधूनमधून भेटत.

त्यांचा विषय गार्गीच असायचा. शेवटी प्रसन्नानेच सांगितलं, सुमे तू भेटल्यावर गार्गी आठवते आणि मला अगतिक-निष्प्राण झाल्यासारखं वाटतं. तिच्याशिवाय मी कसा जगतो माझं मलाच माहिती. प्लीज तू गैरसमज करुन घेऊ नकोस. त्याने त्याची बदली देहरादूनला करुन घेतली. आईला घेऊन तो तिकडे गेला आणि आमचा संपर्क तुटला. तो आज कुठे? काय करतो? त्याने लग्न केलं का? काहीच माहित नाही. त्याने दुसरं लग्न केलं नसावं. तो गार्गीत खूप गुंतला होता. सुहास-सुमी अर्थात गार्गी, यांच्याबद्दल तुला माहितीच आहे. सुमीने पुण्याला मैत्रिणी जमवल्या पण गार्गी ती गार्गी. मनाच्या एका कप्प्यात तिने तिला बंद करुन ठेवलं आहे, सुहासने अमाप कष्ट केलेत. नोकरी करता करता एम.बी.ए केले. एकदा काय मनात आलं वर्धेचे घर विकलं आणि तळेगावला एक प्लॉट घेतला.

कुमुदचे अधूनमधून फोन यायचा. हल्ली तो ही बंद झाला. यांना जोडणारं निमित्यच संपल आणि ते नातंही. मी प्रसन्नाचे समजू शकते. कुमुद का दुरावली मला माहित नाही. सुमीला याचा त्रास होतो. तिने परिस्थितीशी जुळवून घेतलं. सुहास-सुमीने हॅल्पिंग हॅन्ड संस्था सुरु करण्याचा प्रयत्न केला. असं काही करणं त्यांचा पिंडच नाही म्हणून ते त्यांना जमलंच नाही.

मला म्हातारीला तारखा-साल आठवतं नाही. आज या गोष्टीला कमीत कमी बावीस-

तेवीस वर्षे सहज झाली असतिल.

आता राहिली तुझ्या दोन प्रश्नांची उत्तरं ती मला माहिती नाही ग. एक म्हणजे प्रसन्नाचे पुढे काय झाले? आणि कुमुद का दुरावली? असो काही प्रश्नांची उत्तरे एकतर आपोआप मिळतात आणि काहींची सापडता सापडत नाही. तुला काय हवं ते समजं. आता स्वैयंपाक पटपट कर आजोबांना भूक लागली असेल. नाही तर असं कर खिचडी पिठलं कर...." आजी

अनुला एका कथानकात वावरल्यासारखं वाटतं होतं. नचिकेत ऑफिसमधून आल्यावर त्याला सांगू. राहून राहून तिच्या डोक्यातून हेल्पिंग हॅंड संस्था काही केल्या जात नव्हती. गार्गीची ती इच्छा पूर्ण करायचा प्रयत्न आईबाबांनी करुन बघितला. मी काही करु शकते का? या विचारांत घरातले कामं आटोपले. आईबाबा येणार. त्यांना घ्यायला जायचं आहे. अरे हो, नचिकेतला कॅब बुक करण्याची आठवण करुन द्यायची आहे. त्यांचे वेलकम धडाक्यात करु. अनुच्या डोक्यातला विचारांचा पिंगा संपत नव्हता......

सगळे विचार बाजूला झटकून ती पी.एच.डीच्या अभ्यासाला बसली. तिला एखाद्या मॅगझ़िन किंवा वर्तमानपत्रात तिच्या विषयाला अनुसरुन एक आर्टिकल लिहायचा होता.

पुष्कळ दिवसांपासून ती काय लिहू या संभ्रमात होती. सायकालॉजीला धरुन चांगला विषय सापडत नव्हता. "हेल्पिंग हॅंड" नाव कसं वाटेलं? या विचारांच्या ओघात ती लिहू लागली आणि बघता बघता आर्टिकल पूर्ण झाला. अनुचा विश्वास बसतं नव्हता.

नचिकेतला ऑफिसमधून आल्या आल्या बाईसाहेबांनी सगळं सांगायला सुरवात केली.

तुला हे सर्व कळले कुठून? ओके म्हणजे तू आजीला सांगितलं सगळं. मला वाटलच तू असं काही करशील म्हणून....ॲनी वे...आजी कशी आहे? नचिकेतच्या आवाजात काळजी होती.

"त्या ठीक आहेत. हे सर्व सांगतांना त्यांनाही त्रास झाला रे, पण मोकळंही वाटलं." अनु

"मी कॉफी आणते. आधी तू हा आर्टिकल वाच, सुधारणा आहेत का सांग. कुठे पाठवायचा ते ठरवू. नंतर सविस्तर बोलू. नचिकेतला विचारात हरवलेला बघून लगेच अनु म्हणाली.

ह्म्म....वाचला?....कसा वाटला ? अनु

विचारलं नसतं तरी सांगणारच होतो मॅडम. मस्तच झाला आहे. एक दोन चुका दिसल्यात त्या मी ठीक केल्या. कुठल्या मॅगझ़िन ला देणार? नचिकेत

कुठला विचार करतो आहेस..? अनु

आपण या हेल्पिंग हॅंडबद्दल काही करु शकतो का? नचिकेत

“यस! सकाळपासून मी हाच विचार करतं होते रे. यातूनच तर हे सगळं तयार झालं.” अनु

असं कर हा लेख इंडियन एक्सप्रेस ला देतो, माझ्या मित्राचा भाऊ आहे तिथे. नचिकेत

आईबाबांना घ्यायला तू येणार आहेस? नचिकेत

हो ! अर्थातच....हे काय विचारणं झालं. अनु

ती आणि आजी आईबाबांच्या स्वागताची काय काय तयारी करतं आहे ते सांगितलं. बोलता बोलता तिला लक्षात आलं नचिकेत मिस्कील हासतो आहे....

"का रे काय झालं? जा मी नाही बोलतं." लटक्या रागाने ती म्हणाली.

तू जेव्हा बोलायला अधीर होते तेव्हा तू इतके भरभर बोलते आणि खूप एक्साईट असते. अगदी एखाद्या लहानमुली सारखी. नादात तू जे सांगायचं ते अर्धवट सांगते. अर्धे शब्द ओठात अर्धे पोटात रहातात"

बघ, तू आत्ताच म्हणाली... गाडीचं... आणि लगेच म्हणाली.... नंतर पूजा.... सगळं आटोपलं की दगडूशेठ ला जाऊन येऊ....... ओठातंन एवढंच निघालं बाकी शब्द गेले पोटात. मला कळलं. मी गाडी बुक केली, तू पुजेची सगळी तयारी केली शेजारच्या नैना काकूला जेवायला बोलवलं. तुझे आईबाबा येणार आहेत. आणि.... आणि हो दगडूशेठला अभिषेकाची व्यवस्था मी बघतो. नचिकेत तिच्याकडे कौतुकानं पहात म्हणाला.

"अशीच आहे मी !" अनु म्हणाली.

"म्हणून तर मला आवडते." नचिकेत लाडात येत म्हणाला.

खूप दिवसांनी आईबाबांना बघून आनंद झाला. कशी झाली ट्रीप? माझ्यासाठी काय काय आणलं? नचिकेत गाडीत बसतांना म्हणाला.

"अरे हो! घरी जाऊ मग दाखवते सगळं." आई .

नचिकेतच्या मनात कुठलीच अढी नाही हे बघून अनुला हायसं वाटलं.

गाडीत तीन तास चौघांनी खूप गप्पा मारल्या. कुठे कुठे गेलो, काय बघितलं, खाण्याचे हालं फार नाही झाले, कंपनी चांगली मिळाली, आणि खूप काही.

घरी आल्यावर आजी औक्षणाचं ताट घेऊन दारात उभीच होती. ठरल्या प्रमाणे पूजा, जेवणं आटोपलं. दोन तीन दिवस जेट लॅगमधेच गेले. नंतर अनु, गार्गी(सुमी)आणि आजी तिघींच्या गप्पांना उधाण आलं होतं. फोटो बघितले. सी.डी बघितली. नचिकेतने तर आधी सुटकेस उघडून लहानमुलासारखं माझ्यासाठी काय आणलं म्हणत कारभार केला. जवळ जवळ दहा दिवस आमच्या प्रवासाच्याच गप्पा सुरु होत्या.

अनु तुझा इंडियन एक्सप्रेसला लेख आला आहे "हेल्पिंग हॅंड". आंघोळ नाश्ता उरकला की वाचतो. नचिकेत खोलीतून मोठ्याने म्हणाला.

टॉवेलला हात पुसत आईने स्वैयंपाकघरातून बाहेर येतं म्हंटलं...."काय?" त्यांच्या एका "काय" मधे भिती, काळजी आणि आश्चर्य तिन्ही भाव होते. अनु मनोमन घाबरलीच. आता कसं सुचलं काय सांगू? तेवढ्यात आजी पूजा करता करता म्हणाल्या अं ...अग.....अनु

आपल्या पी.एच.डीच काहीतरी लिहित होती. बिचारीला नावच सुचत नव्हते. मीच सुचवलं.

"मग...माझ्याही मदतीचा हात होता..."आजोबा पेपर बाजूला करीत म्हणाले.

तुमचा कसा? आजीने त्रासिकमुद्रेत विचारले.

"अनुने लिहिले इंग्रजीत. तुला ते मराठीत कोणी समजवून सांगितले? मीच ना" आजोबा पेपरची घडी करत म्हणाले.

"बरं बरं दोघांनी सांगितले. आता खूश." आजी

थँक् गॉड ! आज या दोघांच्या प्रसंगावधानाने परिस्थिती सांभाळल्या गेली. अनुने मनात विचार केला.

हळूहळू रोजचं रुटीन सुरु झालं.

अनुच्या डोक्यातून एचएचचा विषय काही केल्या जात नव्हता. ती लॅपटॉपवर काम करत असतांना तिला तिचाच एक जुना सर्व्हे रिपोर्ट दिसला. यस! आपणच हडपसर येथिलं मानसिक रुग्णांच्या एका आश्रमात गेलो होतो. मनोरुग्ण लहान मुलांची मानसिक प्रगती साधण्यासाठी तिने काही उपचार पध्दतींबद्दल लिहिले होते. पुन्हा एकदा तिने त्यासंबधी

पुस्तकं वाचलेत. संदर्भ गोळा केलेत आणि त्यातून एक उपक्रम तयार केला. "हेल्पिंग हँड- वन स्टेप टुवर्डस डेव्हलपमेंट ऑफ मेन्टली रिटार्डेड चाईल्ड". अर्थात "मदतीचा हात- चिमुकल्या मनोरुग्णांसाठी उचललेले पहिले पाऊलं." या उपक्रमाला फायनल टच देण्यासाठी ती आजोबा आणि बाबांशी यावर चर्चा करत होती. दोघांनी तिला थोड्याफार सुधारणा सांगितल्या. आजी आणि आई हे सगळं ऐकत होत्या. सुमीने हळूच आजीकडे प्रश्नार्थक नजरेने बघितले. मी तिला फक्त नाव तेवढं सुचवलं म्हणत मोठ्याने श्रीसुक्त म्हणू लागल्या. आजीचा आव बघून अनुने चर्चा आटोक्यात घेतली आणि काम आहे म्हणत लॅपटॉप घेऊन खोलीत पळाली.

कॉलेजमध्ये एच ओ डी, डॉ. पोंकशेंना प्रेझेंटेशन आवडले. उद्या ग्रुप डिस्कशन मधे इतर स्टुडंट्ससोबत बोलू. तिला वाटलं त्यांना आवडेल. तसं ते काहीच म्हणाले नाही. जाऊ दे उद्या इतरांची प्रतिक्रिया बघू. आपण या बाबतीत उगीच घाई करतोय तिच्या लक्षात आलं. विचार करायला त्यांना वेळ द्यायला हवा.

आज अनुच्या मनासारखं झालं. सर्वांनी कल्पना उचलून धरली. हा प्रोजेक्ट करायचं असं ठरलं आणि तयारी सुरु झाली. पुण्यात मनोरुग्णांच्या किती संस्था आहेत? त्यांची

ट्रीटमेन्ट कशी सुरु आहे? यात कसले अडथळे येतात? या संबधी संस्थेची, तिथल्या स्टाफ ची भूमिका काय?  डॉक्टरांचे, तज्ञांचे काय मतं आहे? सगळा स्टॅटेस्टिकल डेटा तयार करण्यात आला. ग्रुप्स तयार झालेत आणि सगळे कामाला लागले. आपल्या एका विचाराचं बीज रुजून त्याचे रोप तयार होईल अनुला कधीच वाटलं नव्हतं. प्रयोग यशस्वी होत होता. अनेक सेवाभावी संस्था मदतीसाठी पुढे आल्या. या प्रोजेक्टमधे अनुचे सहा महिने कसे निघून गेले ते कळलंच नाही. तिच्या या उपक्रमाचं सुमीला कौतुक वाटतं होतं. मनोमन तिला आपण जे करु शकलो नाही ते सून करते याचा आनंद होत होता. आज तिला गार्गीची आठवण आली. तुझं स्वप्न अर्धवट नाही रहाणार, माझी अनु ते पूर्ण करणार. तिला कुठे ठाऊक होते या संकल्पनेचा जन्म गार्गीमूळेच झाला आहे ते.

अनुने सगळे डिटेल्स फेसबुकवर अपडेट केले. तिच्या या उपक्रमाला नेटवर छान प्रतिसाद मिळाला. हेल्पिंग हॅंडचा वृक्ष परत बाळसं धरू लागला.

तोच वीणाने तिच्या मैत्रीणीने पुण्यातला दोन संस्था मनोरुग्णांसाठी एकत्र येऊन काम करायला तयार असल्याचे सांगितलं. त्या संस्थेंच्या कार्यकारी मंडळाची भेट घेऊन सगळी तयारी करायची होती. जवळ जवळ सहा महिने अनुचे युध्द पातळीवर प्रयत्न सुरु होते.

अशा उपक्रमांना यशस्वी होण्याकरता मनुष्यबळ तर लागतचं आर्थिक मदतीची गरज

असते. मोठ्या लोकांना हाताशी घेऊन आपणच रिसोर्सेस उपलब्ध करुन घ्यायचे असतात. हा उपक्रम यशस्वी होण्याकरीता अर्थातच नचिकेतनी आणि घरातल्या सगळयांनी खूप मदत केली. थोडक्यात, अधिक मदतीचे हात-अधिक आर्थिक मदत. आता सगळे रिसोर्सेस शंभर टक्के उपयोगात आणून आपला प्रोजेक्ट यशस्वी करायचा. गार्गीचे स्वप्न पूर्ण होणार याची तिला आशा होती. प्रसन्ना जिथे कुठे असेल त्याने नुसते नाव जरी वाचले तरी त्यालाही आपल्या गार्गीचे स्वप्न पूर्ण झाल्याचे समाधान मिळेलं. कोणास ठाऊक तो कुठे आहे?

संस्थेच्या एकत्रीकरणाचे जवळ जवळ सगळे सोपस्कार पूर्ण झालेत. उदघाटन समारंभ ठरवायचा होता. प्रमुख पाहूणे, अध्यक्ष, सत्कार समारंभ बरीच मोठी यादी होती. संस्थेचा स्टाफ कार्यक्रमाची जय्यत तयारी करीत होता. प्रमुख पाहूण्यांचा प्रश्न सुटला नव्हता. ज्यांना गाठले त्यापैकी कोणाला वेळ नव्हता, नेहमीच्याच सबबी. शक्यतो राजकारणातील व्यक्ति आम्ही टाळत होतो. एक क्षण माझ्या मनात कुमुद गुंदेचा नाव आलं. त्या कुठे आहेत? त्यांचा पत्ता शोधायचा का? समजा तो मिळाला तर त्या तयार झाल्या पाहिजे. सगळं असं घडणं किंवा घडवणं जरा कठीणच होत. आधी नचिकेत आणि आजीआजोबांशी बोलू मग ठरवू. अनु मनातल्या मनात म्हणाली. तिघांना कल्पना आवडली. संस्थेच्या लोकांशी आधी बोललं पाहिजे.

"मी कुमुद गुंदेचाबद्दल माहिती शोधते"  अनु

"थांब, थांब"....नचिकेत म्हणाला.

त्याने कोणाला तरी फोन लावला.

"काम फत्ते झालं अनु. थोड्यावेळात माहिती मिळेलं." नचिकेत

अगं! रोहनची मावशी समितीच्या पुणे केंद्रात कामं करते. जर कुमुद समितीच्याच कामानिमित्य कुठे कामं करत असेल तर आपल्याला कळेलं.

वाट बघावी लागणार... अनु

ह्म्म, थोडावेळ. नचिकेत तिच्याकडे कौतुकाने बघत म्हणाला.

कुमुद गुंदेचा संबधी अनूने पेपर, समितीच्या मासिकातले कात्रण जमवलेत.

रोहनचा मेल आला आहे. नचिकेतने जोरात अनुला हाक मारली.

समितीच्या पुणे केंद्रात त्यांचा पत्ता आणि फोन नंबर मिळाला.

"आश्रय", संचालक

कुमुद गुंदेचा, दिग्रस.

"दिग्रस, हे पुसद आणि यवतमाळजवळ गाव आहे" नचिकेत ने नेटवरुन डिटेल्स काढले.

सगळे संदर्भ घेऊन अनुने प्रोफाईल तयार केला. संस्थेत सदस्यांची बैठक घेऊन यावर चर्चा केली.

"त्यांना संपर्क करून बघा, त्या हो म्हणतात का? हो म्हंटले तर आपण त्यांचा जाण्या येण्याचा आणि रहाण्याचा खर्च करु." संस्थाप्रमुख पाटिलसाहेब म्हणाले.

एक महत्वाचा टप्पा पार झाला होता. आता सगळं कुमुद गुंदेचांच्या होकारावर अवलंबून होतं. त्या होकार देतील का? या विचारात अनु त्यांच्याशी संपर्क झाला तर काय बोलुयात मनात ठरवत होती.

"अनु, तू फोन करु नकोस" नचिकेत

"का? मी संस्थेच्या सल्लागार समितीतल एक सदस्य आहे." अनु

"परत घाई! आडनाव बोधनकर आहे ना. त्यांना साधी शंका आली तर तुझ्या मनासारखं होणार नाही एवढच." नचिकेत.

"अरे हो! मी विसरुनच गेले. असो मी संस्थेतील सेक्रेटरींना सांगते." अनु

"बोधनकर आडनाव अजून कोणाचंही असण्याची शक्यता नाकारता येत नाही. उगीच या स्टेजवर रिस्क नको घ्यायला. त्या हो म्हणतील. काळजी नको करु." नचिकेत अनुला समजावत म्हणाला.

त्यांचा होकार आल्याशिवाय पुढचा विचार करायचा नाही, हे अनुने ठरवलं होतं. संस्थेच्या ऑफिसमधून फोन गेला. आधी येऊ शकणार नाही वैगरे सबबी सांगितल्या. देसाईकाकांनी आपल्या मर्गदर्शनाची आवश्यकता आहे वैगरे असले काही भारी शब्द बोलून त्यांचे मन वळतं केलं. आत्तापर्यन्त तरी अनुच्या प्रयत्नांना यश आले होते. अर्थात आजी आजोबांना तिने विश्वासात घेऊन ही मोहिम हाती घेतली होती. आईबाबांना काहीच कळू दिले नव्हते. दोघी मैत्रिणींची भेट सहज आणि नकळत घडवून आणायची होती. आईंनी खूपदा समारंभाची कार्यक्रम पत्रिका मागितली. सगळे या ना त्या कारणाने टाळत गेले.

उद्घाटन समारोहाचा दिवस उजाडला.

"मी आणि नचिकेत जरा लवकर निघतो. तुम्हाला घ्यायला गाडी पाठवते." अनु आईबाबा आणि आजी अजोबांना म्हणाली.

"आत्तापर्यन्त सगळं व्यवस्थित पार पडलं, पुढेही असंच माझ्या मनासारखं घडू दे रे देवा" अनु मनोमन आळवत होती.

तेवढ्यात कुमुदचं आगमन झाल्याचं सहकाऱ्यांनी कळवलं. तशी अनु त्यांच्या स्वागतासाठी पुढे आली. शांत, संमजस आणि गंभीर कुमुदला बघून अनुला एक क्षण अनुला गहिवरुन आलं. स्मृत्पर्ण डोळयापुढे फडफडत होते. स्मृतींच्या त्या पानांतून कुमुद आत्ता तिच्यासमोर उभी होती. थिजलेल्या अनुला संस्थेच्या संचालकांनी भानावर आणलं आणि ओळख करुन दिली "या अनुप्रिता बोधनकर".

अनु लगेच भानावर येत त्यांच्याशी पीएचडीच्या संदर्भातच बोलत राहिली. अनु खूप नॉर्मल रहाण्याचा आव आणत होती. एक दोनदा त्यांनी घरच्यांची चौकशी केली. मी हे एका खासगी कंपनीत आहे. घरी सासू-सासरे, आजी आजोबा आहे. कुणाचेच नाव न घेता त्या विषयावर तिने बोलणे आटोक्यात घेतले.

"आत्तापर्यन्त मी डायरीतले वाचून कुमुद अश्या एकेरी नावाने संबोधित होते. मीच काय नचिकेत सुद्धा, आता मॅडम म्हणतो आहे." अनुच्या मनात आले.

कार्यक्रम सुरु झाला. प्रमुख पाहुण्यांचा परिचय करुन देण्यात आला. कुमुद गुंदेचा, समाज सेविका, समितीच्या प्रमुख कार्यकर्त्यांपैकी एक. मी हळूच आईंकडे बघितले. त्यांच्या डोळयात पाणी तरंगतांना दिसले. कुमुदला भेटण्याची अधीरता त्यांच्या हालचालीतून मला दिसत होती. आजी जोरात म्हणाल्या अगं ही तर आपली कुमुद....!

आईंनी त्यांचा हात दाबत शांत राहाण्याचा संकेत केला.

सगळयांची भाषणं, सत्कार झालेत. आपल्या अध्यक्षीय भाषणात कुमुदने हेल्पींग हॅंड बद्दल कौतुक आणि आशा व्यक्त केल्यात. या नावाच्या निमित्याने गार्गीची त्यांना आठवण आली असेलच नाही का? अनुच्या मनाचे खेळ सुरुच होते. ती वारंवार स्मृतींच्या पानातील कुमुद आत्ताच्या कुमुदमध्ये शोधण्याचा प्रयत्न करत होती. अधूनमधून ती या स्मृत्पर्णांना झटकून समारंभात एकरुप होण्याचा प्रयत्न करत होती.

दोन तासात कार्यक्रम संपला. ठरल्याप्रमाणे त्यांना ऑफिसमधे चहापानासाठी नेण्यात आलं. तिथे नचिकेत चौघांसोबत हजर होता. संस्थेच्या इतर लोकांशी बोलता बोलता, स्वत:ला सावरत अगदी सहज होत ओळख करून दिली. "मॅडम, हे माझे बाबा सुहास बोधनकर आणि आई गार्गी बोधनकर."

त्यांचा चेहरा बघण्यासारखा होता. हे माझे मिस्टर नचिकेत बोधनकर. आश्चर्य, आनंद, या दोन्ही रसांचा संगम होता. दोघींच्या डोळयात एकमेकींना बिलगण्याची अनिवार इच्छा अनुला, आजीला आणि नचिकेतला दिसली. उपस्थितांसमोर दोघींनी संयम दाखवला. नचिकेतनी रागाने अनुकडे बघितले. ती समजायचे ते समजली.

तुम्ही दोघी एकमेकांना ओळखता? अनुने पटकन विचारले. हो! आम्ही एकाच

शाळेतल्या. दोघी एकदम बोलल्या आणि आजीला बघून कुमुद (मॅडम)नी नमस्कार केला. बघता बघता निघण्याची वेळ झाली.

आजीने त्यांना घरी चलण्यासाठी म्हंटलं, आग्रह करावाच लागला नाही. त्या लगेच तयार झाल्या. बाबा, त्या चौघांना घेऊन पुढे निघाले.

कार्यक्रम संपल्या संपल्या अनुला निघताच आलं नाही. तिच्याच विचारांच हे रोपटं होतं. कर्तव्य सोडून जायचं तिला पटत नव्हतं. असो जे साधायच ते साधलं. दोन मैत्रीणींची भेट घडवून आणली ना. अनुच्या मनात आले. तासाभरात उरलेली कामं आटपून दोघं निघाले.

"मला त्या दोघींना कडकडून भेटलेलं बघायचं होतं रे." अनु

"बरंच झालं, आपण नाही तर निदान त्यांना मोकळं बोलता येईल." नचिकेत

"का? आपल्या समोर का नाही?" अनु

"परत घाई, अग वेडे त्या गार्गीबद्दल आपल्यासमोर थोडीच बोलणार" नचिकेत

"यस! मी विसरुन गेले. आजी सांगेल ना आपल्याला लाइव टेलीकास्ट" अनु एक्साईट

होत म्हणाली.

इकडे घरी गेल्या गेल्या कुमुद आणि सुमी उर्फ गार्गीची गळा भेट झाली. कितीतरी वर्षांचे संचित होते, ते उमाळे सगळे धो धो करुन बरसू लागले. आजीनी दोघींना सावरलं. गार्गीच्या आठवणींनी दोघींना गहिवरुन आलं. "मी यासाठी तुला भेटत नव्हते ग. आपण दोघी गार्गी शिवाय अपूर्ण आहोत. एकमेकींना बघितलं तरी तिची आठवण येणार. आठवणीत आयुष्य घालवणं किती यातना देतं ते मला नाही तर कोणाला माहित. आठवणींच ओझं वाहता वाहता थकून गेली आहे. काही वेळा इतरांच्या दु:खात माझं दु:ख लपून रहातं. आगा नाही -पिछा नाही. एकटीच वणवण फिरते म्हणून आठवणींच ते गाव, ते पाश सगळं सोडलं. अधूनमधून निरंजनदादाला फोन करते एवढच. तू सांग सुमे. सुहास तू किती लठ्ठ झाला. चक्क टक्कल पडलं रे, मी ओळखलच नसतं रे. तुझी सून फार हूशार आहे रे. हे हेल्पिंग हॅंडच नाव तिला कसं सुचलं? खरं तर ते नाव ऐकूनच मी या कार्यक्रमाला आले, नाहीतर मी जात नाही असल्या समारंभाला...." कुमुद

आजीकडे बघतं सुमी म्हणाली हे नाव आईंनी सुचवलं.....

तुम्ही गेले फिरायला. घरातली सगळी कामं आटपून आमच्याकडे लक्ष रहावं म्हणून अनु इथं अभ्यास करत बसायची, आमच्याशी गप्पा करायची. तिच्या प्रोजेक्टबद्दल यांना

सांगयची. मला इंग्रजी कळत नाही म्हणून हे मला ते मराठीत सांगायचे. एका लेखाचं नाव सुचत नव्हतं. एकंदरीत मानसिक त्रास असलेल्या मुलांच्या मदती विषयी काहीतरी आहे एवढचं कळलं. कसं कोण जाणे माझ्या तोंडून निघालं. ते असू दे. आपली बाजू सावरत आजी म्हणाल्या. आज गार्गीला खरा आनंद झाला असेलं. तुम्ही दोघी भेटल्या आणि महत्वाचं म्हणजे तिचं हेल्पिंग हॅंडच स्वप्न पूर्ण झालं. चौघांच्या गप्पा चांगल्याच रंगल्या होत्या. प्रसन्नाबद्दल मात्र कोणालाच माहिती नव्हतं.

तेवढ्यात अनु-नचिकेत आले. मैत्रिणींच्या गप्पा रंगलेल्या बघून हळूच पूटपूटली हरवलेली मैत्री गवसली.

"काही बोललीस?" आईंनी विचारलं.

टाळत काही नाही. काहीच माहिती नसल्याचा आव आणत ती त्यांच्या गप्पांमधे रंगली. रात्रभर मैत्रिणी गप्पा मारत होत्या.

सकाळी कुमुद मावशी, त्यांनीच मला सांगितले "अनु, मला मावशी म्हण". ती निघाली, तिच्या हातात एक बॅग होती. सामान पकडायच्या निमित्याने अनुने त्यात डोकावून बघितलं. त्यात डायरी आणि ती साडी होती. आज स्मृत्पर्णांची देवाण-घेवाण झाली होती. खरच आज गार्गी हवी होती. अनुला उगीच वाटून गेलं.

पेपरमधे बातमी वाचून सुरवातीला समारंभासंबधी बरेच फोन, पत्र आले. लोकं भेटून गेले. नेहमीचं रुटीन सुरु झाले.

सुहास-गार्गी(सुमी), आजी-आजोबा सगळयांच्याच आयुष्यात एक समाधानाचं बीज अनुच्या निमित्याने रुजलं होतं. सुमी-कुमुदच्या इतक्या वर्षांपासून खुंटलेल्या मैत्रीला अंकुर फुटला होता. हेल्पिंग हॅंडच्या वृक्षाची पालवी चांगलीच बहरली होती. ज्या पालकांनी आपल्याला लहानाचं मोठं केलं, त्यांच्या भावनांना तडा न देण्याचा नचिकेतच्या निश्चयाला अनुची साथ होती. आपल्या आई-बाबांना पाहून नचिकेतच्या मनात नाही म्हणता एक सल अजूनही बोचत होतीच. अनु मात्र या बोचऱ्या सलीच टोक बोथट करण्याचा प्रयत्न करत होती. अनुचे थिसीस संपत आले. या डायरीतील मुख्य पात्र प्रसन्ना कुठे होता कोणास ठाऊक? अनुला वाटलं ही बातमी त्यांच्या कानावर गेली तर ते नक्की फोन करतील. तिने बरेच दिवस वाट बघितली. अगदी इंटरनेटवर एन.डी.एच्या साईटवर चेक केले. आर्मीत चौकशी करण्याचा प्रयत्न केला. प्रसन्नाबद्दल काहीच कळले नाही...

"अनु, कधी कधी कथेचा शेवट असाच अर्धवट सोडून द्यायचा असतो. तो गार्गीच्या आठवणींनी झुरत असेल. अश्वत्थामा सारखा, तो जखमेवर तेलं घालण्यासाठी तो द्रौपदीला युगायुगापासून शोधत फिरतो आहे, आणि प्रसन्ना, आठवणींनी जे घाव दिले असतील त्या

जखमांच ओझं घेऊन तोही सुटण्यासाठी फिरत असेल....." नचिकेत अनुची घालमेल बघत म्हणाला.

अनु ए अनु. आईंनी आवाज दिला. तुमच्या संस्थेत जुनं सामान घेता का? .

हो, घेतो ना, काय द्यायचं आहे? अनु

थोडेसे कपडे, एक पंखा आहे, तो जुना कंप्युटर टेबलं. तुला पैसे देते. थंडीचे दिवस आहेत. हेल्पिंग हॅंडमधल्या मुलांसाठी चादरी, ब्लॅंकेट जे गरजेच आहे, काय हवं ते घे आणि हो ते माझं जुनं कपाट दिलं तर चालेल का?

अनुने डोळे मिटून हो म्हंटलं. "आठवणींच कपाट"  आठवणीतल्या उपक्रमात हेल्पिंग हॅंडमधे जाणार या कल्पनेनं तिला आनंद झाला. गार्गीला मनातल्या मनात धन्यवाद देतं ती कामाला लागली.

"आपल्याला जर मुलगा झाला तर आपण त्याचं नाव प्रसन्ना ठेवू ओके." नचिकेत.

>>>>>>>>>>>>>>>>>>>>>><<<<<<<<<<<<<<<<<<<<<<<<.

# विनीता श्रीकांत देशपांडे



मराठी वाचकांना विनीता देशपांडे या उत्तम कथालेखिका व कवयित्री म्हणून माहित आहेतच. त्यांनी आजवर वहिनी, आरती, उत्तमकथा, स्त्री, सत्याग्रही विचारधारा, शब्द, उत्तमअनुवाद, केल्याने भाषांतर, उद्गार, इ.मासिक आणि दिवाळी अंकासाठी लेखन केले आहे, आकाशवाणी पुणे केंद्रावर काव्यवाचनाचे कार्यक्रम पण केले आहेत. सामाजिक जाणिवेतून त्यांनी नचिकेत बालग्राम, अकुर्डी, पुणे येथे "एक तासाची आई " हा उपक्रम, समुपदेशन आणि इतर विविध उपक्रम चालवले. त्यांच्या कविता व दोनुल्या विविध ठिकाणी प्रसिद्ध होत असतात. मायबोली या संस्थळावरून ज्यांना आपल्या प्रतिभेचे अंकुर पुन्हा फुलवता आले त्यातल्या विनीताजी एक. त्यामुळे मायबोलीचे आभार मानल्याशिवाय (या पुढच्या काळातल्या मराठी साहित्याला) पुढे जाताच येणार नाही.

स्मृत्पर्ण ही विनीता देशपांडे यांची पहिली कादंबरी. कशी वाटली ते नक्की कळवा. त्यासाठी त्यांचा संपर्क : विनीता श्रीकांत देशपांडे

मो.नं-९८९०६४६५७७ इमेल-vsdeshpande14@gmail.com

# ई साहित्य प्रतिष्ठान

ई साहित्य प्रतिष्ठानच्या वेबपेजवर सातत्याने नवनवीन भर पडत असते. आपण पहाता ना? नवीन सुमारे तीस पुस्तकं लवकरच येत आहेत. सगळीच तुम्हाला हवी असतील तर संपर्कात रहा. VIP सभासद बना.

VIP सभासद बनणं अगदी सोप्पं आहे. आपल्या ओळखीच्या दहा लोकांचे मेल आय डी द्या आणि बना VIP सभासद. एका दमात तीन कामं. एकतर तुम्ही VIP सभासद बनता. ज्या दहा लोकांना तुमच्यामुळे फ़्री पुस्तकं मिळतात ते खुश होतात. आणि यातून तुम्ही मराठी भाषेच्या संवर्धनाला अमूल्य असा हातभार लावता. आहे ना : एक दम : तीन कामं.

संपर्क साधा : esahity@gmail.com